प्रकाशक
रा. ज. देशमुख
देशमुख आणि कंपनी
१९१ शनवार, पुणें २



२ मुखपृष्ठावरील चित्र दीनानाथ दलाल यांचें आहे.

मुद्रक
न. वि. सरदेशपांडे
आदर्श मुद्रणालय
३९५।५ सदाशिव, पुणें २

१५ ऑगस्ट १९४८



मोहन कृष्ण नाडकर्णी

यांच्या

प्रियतम स्मृतीस

समर्पण



# भूमिका

ग्वाल्हेरपासून बेळगांवपर्यंत बृहन्महाराष्ट्रांतील साहित्याच्या पांच व्यासपीठांवरून अध्यक्ष या नात्यानें मी केलेल्या भाषणांचा संग्रह या छोट्या पुस्तकांत केलेला आहे. आणखीहि एक भाषण या संग्रहांत समाविष्ट करण्याचा माझा विचार होता. १९४२ च्या फेब्रुवारींत उस्मानिया विद्यापीठांतील मराठी वाङ्मयमंडळाच्या वार्षिकोत्सवासाठीं हैद्राबादला जाण्याचा योग आला असतां, मुद्दाम द्राविडी प्राणायाम करून, मी शिखर–सिंघणापूर येथील श्रीशंभुमहादेवाचें दर्शन घेतलें; व हैद्राबाद नभोवाणीवरून नंतर त्याचें स्तवनहि केलें. त्या भाषणांत जरूर त्या ऐतिहासिक माहितीची भर घालून तें मी समग्र पुन्हा लिहून काढलें होतें. पण, ता. २ फेब्रुवारी १९४८ रोजीं, गांधीवधाची प्रतिक्रिया म्हणून, जी दंगल नागपूर शहरांत घडून आली, तींत झालेल्या 'शांतानिवासा'च्या विध्वंसांत माझ्या ग्रंथसंग्रहाबरोबर या भाषणाचें हस्तलिखितहि नष्ट होऊन गेलें. नभोवाणीवर केलेलें मूळ भाषण हैद्राबादच्या 'निजामविजय' साप्ताहिकांतून त्या वेळीं प्रसिद्ध झालेलें असल्यामुळें त्याचा समावेश या पुस्तकांत करणें सुशक्य होतें. पण, त्या भाषणाची जी विस्तृत आवृत्ति मी व्यासंगपूर्वक तयार केलेली होती, तिच्या मानानें मूळ भाषण अगदींच जुजबी आणि तुटपुंजें होतें. शिवाय, यादव आणि भोसले या महाराष्ट्रांतील दोन श्रेष्ठ राजवंशांच्या त्या देवस्थानाशीं असलेल्या घनिष्ठ संबंधावरून माझ्या समजुतीनें जीं ऐतिहासिक, पण इतरांना कदाचित् काव्यमय म्हणजेच काल्पनिक वाटण्यासारखीं, अनुमानें मी काढलीं होतीं, त्यांची मनावरील मोहनी कायम असल्यामुळें, मला तें त्रोटक भाषण या संग्रहांत घालावयाला उत्साह वाटला नाहीं. अर्थात् माझ्या मूळ योजनेच्या दृष्टीनें हा संग्रह आज अपूर्ण स्थितींतच प्रकाशित होत आहे.

हीं पांच भाषणें जरी बृहन्महाराष्ट्राच्या वेगवेगळ्या भागांत केलेलीं असलीं, तरी त्यांतील मुख्य आणि मध्यवर्ती प्रतिपाद्य विषय महाराष्ट्र एकीकरण हाच एक आहे. किंबहुना, माझ्या भाषणांचा जो पहिला संग्रह 'आव्हान' या नांवानें १९४१ च्या आक्टोबरमध्यें प्रसिद्ध झाला, त्यांतीलहि प्रधान विषय 'महाराष्ट्र एकीकरण' हाच होता. १९४० च्या जानेवारींत, उज्जयिनी

येथील महाराष्ट्र वाङ्मय मंडळाच्या आठव्या अधिवेशनाचा अध्यक्ष या नात्यानें बोलतांना, त्या वेळीं नुकत्याच सुरू झालेल्या महायुद्धाची हिंदी राजकारणावर होत असलेली प्रतिक्रिया लक्षांत घेऊन, मी प्रथम महाराष्ट्र एकीकरणाचा पुरस्कार केला; व मुंबईच्या ' विविधवृत्त ' साप्ताहिकानें त्या भाषणाचें वर्णन 'साहित्यिकाचें राजकारण' या मार्मिक टीकात्मक शब्दांनीं केलें होतें. तेव्हांपासून गेलीं आठ वर्षे साहित्याच्या व्यासपीठावरून या एकाच विषयावर मी सतत बोलत आलों असून, त्यामुळें माझ्या मित्रांनाहि माझ्याविषयीं एक प्रकारची धास्ती आणि, मला वाटतें, उबगाहि उत्पन्न झाला असावा. कारण, कल्याण येथें १९४० च्या नोव्हेंबरमध्यें भरलेल्या मुंबई साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष या नात्यानें केलेल्या भाषणासंबंधीं बोलतांना माझे रसिक मित्र डॉ. भालेराव हे मला म्हणाले, " काय हो, तुमच्याजवळ महाराष्ट्र एकीकरणाशिवाय दुसरा विषयच नाहीं का ? प्रत्येक ठिकाणीं तुम्ही आपलं हें एक ठरलेलं रेकॉर्ड लावतां! आतां पुन्हा कांहीं तुम्हांला अध्यक्ष म्हणून आम्ही बोलावणार नाहीं, गजाननराव!!" या सगळ्या अनौचित्याची परमावधि बेळगांव येथें १९४६ च्या मेमध्यें भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनांत झाली. तेथें मी जो अध्यक्ष म्हणून गेलों, तो महाराष्ट्र साहित्यसंमेलनांतर्गत ललित साहित्यसंमेलनाचा ! आणि भाषण जें केलें, तें महाराष्ट्र एकीकरणावर !! या अनौचित्यावर माझे समव्यवसायी, ' लोकमान्या 'चे संपादक श्री. पां. वा. गाडगीळ यांनीं अशा आशयाची सुंदर टीका केली होती कीं, " नाजुक, सुवासिक फुलांचा सडा अंगावर पडेल अशा आशेनें आपण पहांटेच्या वेळीं प्राजक्ताच्या झाडाखालीं जाऊन उभें रहावें आणि त्याऐवजीं अचानक गारपीट व्हावी, तसा प्रकार माडखोलकरांच्या अध्यक्षीय भाषणाच्या बाबतींत झाला आहे!".

पण, मजसारख्या ' साहित्यिक ' समजल्या गेलेल्या माणसावर अशा प्रकारचीं ' अनुचित ' भाषणें पुनःपुन्हा करण्याचा प्रसंग कां ओढवला, याचा विचार माझ्या टीकाकारांनीं केलेला दिसत नाहीं. मला स्वतःच्या मर्यादा समजतात आणि माझें औचित्याचें भानहि तीव्र आहे मग महाराष्ट्र एकीकरणासारख्या अत्यंत बिकट, गुंतागुंतीच्या राजकीय प्रश्नाला हात घालण्याच्या भानगडींत मी कां पडलों ? त्याचें एक कारण जसें स्वतःच्या अंतःकरणाची अनिवार्य

ओढ हें सांगतां येईल, तसेंच दुसरें त्याहीपेक्षां प्रबळ कारण त्या प्रश्नाच्या बाबतींत महाराष्ट्राच्या राजकीय नेत्यांची अक्षम्य अनास्था हें सांगतां येईल. महायुद्ध सुरू झाल्याबरोबर हिंदी स्वातंत्र्याचा प्रश्न निकराला येऊन सुटण्याच्या मार्गाला लागला; व स्वतंत्र हिंदुस्थानाची राज्यघटना कोणत्या प्रकारची राहील याचेंही स्पष्ट चित्र डोळ्यांपुढें उभें राहिलें. हें घटनात्मक स्थित्यंतर होण्याच्या वेळीं भावी हिंदी संघराज्यात सर्व मराठी प्रदेशाचें एकीकरण होऊन महाराष्ट्राला स्वायत्त घटक प्रांताचा दर्जा मिळावा असा प्रयत्न करणारी एकहि मध्यवर्ती संस्था मला महाराष्ट्रांत कुठें दिसेना. आंध्र महासभा आणि संयुक्त कर्नाटक परिषद या दोन संस्थांच्या आपआपल्या विशिष्ट प्रांताचें एकीकरण आणि स्वायत्तता यासाठीं सतत पंचवीस वर्षे चालू असलेल्या चळवळी व डॉ. पट्टाभिसीताराम अय्या, श्री. दिवाकर यांच्यासारख्या कॉंग्रेसधुरीणांकडे असलेलें त्या चळवळींचें नेतृत्व मी पहात होतों. पण महाराष्ट्रांत मात्र कोणत्याच प्रकारची जागृति मला या बाबतींत दिसेना. उलट, कै. न. चिं. केळकर, कै. डॉ. बा. शि. मुंजे, श्री. मा. श्री. अणे, श्री. शंकरराव देवप्रभृति महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतले आणि निरनिराळ्या पक्षांचे धुरीण या प्रश्नासंबंधीं उदासीन किंवा अननुकूल आहेत, असें माझ्या प्रत्ययाला आलें ही परिस्थिति लक्षांत घेऊन ता. २ जानेवारी १९४० रोजीं उज्जयिनी येथें महाराष्ट्र वाङ्मयमंडळाच्या अध्यक्षपदावरून मी प्रथम संयुक्त महाराष्ट्राची घोषणा केली; व त्यानंतर ता. २८ जानेवारी १९४० रोजीं मुंबई येथें श्री. ग. वि. पटवर्धन यांच्या परिश्रमांमुळें जी 'संयुक्त महाराष्ट्र सभा' स्थापन झाली, तिच्या उपक्रमांतहि मी उत्साहानें भाग घेतला. पण महाराष्ट्रांतील पक्षद्वेष आणि या प्रश्नाविषयींची उपेक्षाबुद्धि या दोन कारणांमुळेंच मुख्यतः ही सभा कार्यक्षम होऊं शकली नाहीं. त्यामुळें, माझ्या मनाला सारखें वाटे कीं, भावी हिंदी राज्यघटना तयार करावयाला ज्या वेळीं घटनासमिती बसेल, त्या वेळीं आंध्र, कर्नाटक किंवा केरळ यांच्या भाषावार प्रांतपुनर्घटनेच्या कैफियती तिला अधिकारपूर्वक सादर करावयाला जशा त्या त्या प्रांतांतून मध्यवर्ती, सर्वपक्षीय जबाबदार संस्था आहेत, तशी संस्था महाराष्ट्रांत जर या संक्रमणकालीं निर्माण झाली नाहीं, तर त्याचें केवढें नुकसान होईल? म्हणून, साहित्याचें जें जें व्यासपीठ त्यानंतर माझ्या तावडींत सांपडलें, त्याचा त्याचा उपयोग, अनौचि-

त्याच्या किंवा पुनरुक्तीच्या आरोपांची पर्वा न करितां, मी संयुक्त महाराष्ट्राचा उद्घोष करण्यासाठीं बेदरकारपणानें केला.

या मनःस्थितींत मी असतांनाच १९४४ च्या नोव्हेंबरांत, औरंगाबाद येथील नभोवाणीवर भाषणें करण्याच्या निमित्तानें, निजाम–हैद्राबाद संस्थानांतील मराठवाड्यांत जाण्याचा प्रसंग माझ्यावर आला. त्या वेळीं औरंगाबाद, पैठण, परभणी आणि नांदेड या मराठवाड्यातील चार मुख्य शहरीं मी गेलों असतां महाराष्ट्राची आदिभूमि म्हणून गाजलेल्या पंचावन लक्ष लोकसंख्येच्या त्या समृद्ध प्रदेशांतील मराठी जनतेचें जें विलक्षण दैन्य मी पाहिलें, त्यामुळें माझें हृदय अगदीं पिळवटून गेलें; व निजामी सत्तेच्या नादिरशाही नियंत्रणांतून मराठी जनतेला मुक्त करण्यासाठीं महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न प्रथम हातीं घेतला पाहिजे, अशी तळमळ माझ्या मनाला लागली. राजकारणांत 'दडपण' ( pressure ) ही एक फार महत्त्वाची अप्रत्यक्ष शक्ति, हा एक फार महत्त्वाचा बिनतोड डाव आहे. स्वतंत्र हिंदुस्थानाचा संयुक्त महाराष्ट्र हा जर एक स्वायत्त बलशाली घटक झाला, तर भारतीय आणि महाराष्ट्रीय अशा दुहेरी दडपणाच्या प्रभावानें, निजामाची अधिसत्ता यदाकदाचित् कायम राहिली तरीसुद्धां, मराठवाड्यांतील जनतेला स्वायत्तता प्राप्त होऊन सांस्कृतिक दृष्ट्या तरी तिला संयुक्त महाराष्ट्राशीं एकजीव होतां येईल, अशी कल्पना माझ्या मनांत आली; व ता. २८ मे १९४५ रोजीं मराठवाडा साहित्यसंमेलनाच्या तिसऱ्या अधिवेशनाचा अध्यक्ष या नात्यानें जें भाषण मी केलें, त्यात महाराष्ट्र एकीकरणाच्या तत्त्वाला धरून या कल्पनेचा पुरस्कार मी केला. श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. काशिनाथराव वैद्य, श्री. आनंदराव वाघमारे, श्री. गोविंददास श्रॉफ प्रभृति मराठवाड्यांतील जुने–नवे राजकीय कार्यकर्ते या अधिवेशनाला हजर होते. त्यांना माझें भाषण फार आवडलें. पण, निजामाच्या सत्तेच्या बलाढ्यतेविषयीं अशी कांहीं दहशत त्यांच्यापैकीं कांहींच्या मनांत बसलेली होती कीं, "तुमच्या भाषणांतील प्रादेशिक स्वायत्ततेची कल्पना आणखी दहा वर्षें तरी अमलांत येण्याची शक्यता दिसत नाहीं," असे उद्गार श्री. काशिनाथराव वैद्य यांनीं काढले. त्यावर मी त्यांना म्हटलें," "दहा वर्षांत निजाम ही चीजच मुळीं नष्ट होऊन जाईल, अशी माझी खात्री आहे. माझ्या भाषणामुळें इथल्या मंडळीला

त्रास होण्याची धास्ती जर मला वाटली नसती, तर मी ही गोष्ट या व्यास-पीठावरूनहि जाहीर करावयाला चुकलों नसतों !" अधिवेशन संपल्याबरोबर लगेच मी परभणी, नांदेड आणि हैद्राबाद येथें जाऊन संमेलनांत निश्चित झालेल्या कार्यक्रमावर भाषणें केलीं; व पुन्हा १९४६ च्या जानेवारी–फेब्रुवारींत औरंगाबादपासून बिदरपर्यंत मराठवाड्याच्या अंतर्भागांत दौरा काढून मराठवाड्याची स्वायत्तता आणि महाराष्ट्राचें एकीकरण या दोन मुद्यांवर गांवोगांव भाषणें केलीं. या दौऱ्यांत महाराष्ट्राच्या या आदिभूमीचें पारतंत्र्य किती संस्कृतिशोषक आहे याचा मला प्रत्यक्ष अनुभव येऊन महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न निकराला आणल्या-शिवाय गत्यंतर नाहीं, अशी माझी खात्री होऊन गेली. हे विचार माझ्या मनांत थैमान घालीत असतांनाच एप्रिलच्या पहिल्या आठवड्यांत बेळगांवच्या निवडणुकीची तार माझ्या हातीं पडली. तेव्हां, महाराष्ट्र जनता आणि राजकीय पुढारी यांचें या अत्यंत उपेक्षित पण अतिशय जिव्हाळ्याच्या प्रश्नाकडे तांर-डीनें लक्ष वेधण्याच्या उद्देशानें मी त्या निमंत्रणाचा स्वीकार केला. माझ्या कांहीं मित्रांची अपेक्षा अशी होती कीं, निदान या ललित साहित्यसंमेलनाच्या अध्यक्ष-पदावरून तरी मी ललित वाङ्मयाविषयीं झकास भाषण करून कला आणि जीवन, वाङ्मय आणि नीति, पुरोगामित्व आणि पश्चाद्गामित्व वगैरे साहि-त्यांतील चिरचर्चित कूट प्रश्नांचें पुनश्च चर्वण करीन.

पण, ता ३ मे १९४६ रोजीं नागपूरहून बेळगांवास जावयाला मी जो निघालों, तोच मुळीं या निर्धारानें कीं, यदृच्छेनें आपल्या वांट्याला आलेलें अखिल महाराष्ट्राच्या साहित्याचें हें अत्युच्च व्यासपीठ याच एका प्रश्नाच्या प्रचारार्थ राबवून घ्यावयाचें. त्यामुळें, ता. ९ एप्रिल रोजीं संमेलनाच्या अध्यक्ष-पदावर माझी निवडणूक झाल्याची तार मला आल्यापासून संमेलनाच्या सर्व शक्ति या एका प्रश्नाला जुंपण्याच्या दृष्टीनें मी उद्योगाला लागलों; व ता. २० एप्रिल रोजीं महाराष्ट्र एकीकरणासंबंधींचे तीन ठराव तयार करून प्रो. डॉ. शं. दा पेंडसे, प्रो. श्री. ना. बनहट्टी, श्री. पु. य. देशपांडे आणि सौ. विमलाबाई देशपांडे, श्री. ए. श्री. पटवर्धन, श्री. पु. दि. ढवळे, श्री. मो. शा. शहाणे प्रभृति नागपुरांतील महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या प्रमुख सद-स्यांच्या सह्यांसह मी ते स्वागतमंडळाकडे पाठविले. हे ठराव ' तरुण भारतां'-तून प्रसिद्ध झाले; व माझ्या विनंतीवरून ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर,

आचार्य विनोबाजी भावे, श्री. न. वि. गाडगीळ, श्री बा. गं. खेर, श्री. दिगंबरराव बिंदु, श्री. आनंदराव वाघमारे, श्री. दा. वि. गोखले, श्री. शं. रा. शेंडे प्रभृति महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील कार्यकर्त्यांनीं या ठरावांविषयींची आपली अनुकूलताहि मला तत्परतेनें कळविली. ता. ३० एप्रिल रोजीं सायंकाळीं नागपूरच्या नगरभवनांत माझा जो जाहिर सत्कार झाला, त्या प्रसंगीं मध्यप्रांत–वऱ्हाडचे प्रधानमंत्री ना. पं. रविशंकर शुक्ल, शिक्षणमंत्री ना. सं. वि. गोखले आणि अन्नमंत्री ना. रा. कृ. पाटील हे तिघेहि हजर होते. त्या वेळीं झालेल्या गौरवपर भाषणांना उत्तर देतांना या तिघांहि मंत्र्यांच्या समक्ष, त्या सुमारास दिल्ली येथें चालू असलेल्या राजकीय वाटाघाटींचा उल्लेख करून, महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न धसाला लावून घेण्याच्या एकमेव उद्देशानें मी बेळगांवला जात आहे, असें मी जाहीर केलें. नंतर मुंबई आणि पुणें या दोन्ही ठिकाणीं झालेल्या सत्कारसमारंभांतहि मी पुन्हा याच आशयाचीं भाषणें केलीं. पुण्यास गेल्यावर महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचे नियोजित अध्यक्ष, माझे ज्येष्ठ मित्र, प्रो. द. वा. पोतदार यांनीं माझे ठराव राजकीय असल्याबद्दल प्रथम आक्षेप घेतला; पण नंतर भाषिक दृष्ट्याहि ते जिव्हाळ्याचे आणि महत्त्वाचे असल्यामुळें संमेलनाच्या कक्षेंत येऊं शकतात, असा निर्णय देऊन ते मंजूर करवून घेण्याच्या आणि त्या ठरावांतून पुढें उद्भवलेल्या संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या चळवळीच्याहि कामीं त्यांनीं मला पराकाष्ठेची मदत केली. प्रो. पोतदार यांनीं जर ते ठराव नियमबाह्य ठरविले असते, तर मी बेळगांवला जाण्याच्या फंदांत न पडतां बहुधा पुण्याहूनच नागपूरला परत फिरलों असतों. कारण, बेळगावचें अध्यक्षपद हें महाराष्ट्र साहित्यपरिषदेंतील घटनापंडितांच्या कलहचक्राच्या कचाट्यांत सांपडून गौण, विवाद्य आणि आक्षेपार्ह ठरलेलें असल्यामुळें त्याचा स्वीकार न करण्याचा सल्ला श्री. मामासाहेब वरेरकर, राजकवि यशवंत प्रभृति मित्रांनीं मला दिलेला असतांनाहि, घटनादृष्ट्या दुय्यम गणलें गेलेलें तें अध्यक्षपद जें मी पत्करलें, तें केवळ महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न पुढें रेटण्याच्या उद्देशानें; व तो उद्देश सफल होण्याची शक्यता जर मला दिसली नसती, तर मी अध्यक्षपद नाकारून नागपूरचा रस्ता सुधारला असता. किंबहुना, हा माझा निश्चय मी, महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या कार्यालयांत माझ्या ठरावांवर झालेल्या खाजगी चर्चेच्या वेळीं, स्पष्ट बोलूनहि दाखविला होता.

महाराष्ट्र साहित्यपरिषदेंतील श्रेष्ठींशीं ठरावांच्या युक्तायुक्तेसंबंधीं ही वाटाघाट चालू असतांनाच श्री. काकासाहेब गाडगीळ आणि श्री. केशवराव जेधे यांना मी काकासाहेबांच्या निवासस्थानीं भेटलों; व श्री. जेधे यांची संमति घेतली. पुण्यास गेल्याबरोबर श्री. जेधे यांना समक्ष भेटून त्यांची संमति मिळविण्याचा सल्ला 'प्रभात' चे संपादक श्री. श्री. शं. नवरे यांनीं मला दिला होता. तो सल्ला देतांना त्यांनीं असें मार्मिक विधान केलें होतें कीं, "जेधे यांची संमति जर तुम्ही आपल्या ठरावांना मिळवूं शकलांत, तर महाराष्ट्र कॉंग्रेस आणि महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हा तुमच्या ठरावांच्या मागें आहे, असें तुम्ही समजा !" त्या त्यांच्या दूरदर्शी विधानाची सत्यता गेल्या दोन वर्षांतील आमच्या चळवळींत अनेकदां माझ्या प्रत्ययाला आलेली आहे. श्री. जेधे यांचा सरळ, निर्भीड आणि बाणेदार स्वभाव व महाराष्ट्र एकीकरणाविषयींची त्यांची तळमळ या पहिल्या भेटींतच माझ्या अनुभवाला आली; व आमच्या चळवळीला उठाव मिळावयाला त्यांच्या या गुणविशेषांचा चांगला उपयोग झालेला आहे. श्री. शंकरराव देव यांचें माझ्या ठरावांविषयींचे अनुकूल पत्र मी बेळगांवला पोंचतांच माझ्या हातीं पडलें. तें पत्र संपूर्ण पुढें देत आहें:—

शिवाजीनगर, पुणें ५
ता. ४-५-४६

स. न. वि.

बेळगांवच्या साहित्यसंमेलनापुढें संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करण्यासंबंधीं मांडण्यांत येणारे तीन ठराव आपण माझ्याकडे पाठविलेत ते मिळाले. त्यांची पोंच आपल्याला पूर्वींच मिळाली आहे. या ठरावांच्या मागें जें मूलभूत तत्त्व आहे, तें मला पूर्णपणें मान्य आहे. या तत्त्वाप्रमाणें मराठी भाषा बोलणाऱ्यांचा एक प्रांत बनविण्याची एक सर्वसंमत योजना तयार करण्याच्या कामाला महाराष्ट्रांतील प्रमुख लोकांनीं आतां शीघ्र लागलें पाहिजे, असें मला वाटतें; आणि मी माझ्यापरी या दृष्टीनें प्रयत्नास प्रारंभहि केला आहे. स्वतंत्र हिंदुस्थानची जी सर्वांगीण पुनर्घटना होणार, त्यांत भाषावार प्रांतरचना होणें अपरिहार्य आहे इतकेंच नव्हे, तर अत्यंत [illegible] आहे,

कॉंग्रेसनें आपल्या निवडणुकीच्या जाहिरनाम्यांत या तत्त्वाला पुढील शब्दांत पूर्ण पाठिंबा दिला आहे:—

"It (the Congress) has stood for full opportunities for the people as a whole to grow and develop according to their own wishes and genius; it has also stood for the freedom of each group and territorial area within the nation to develop its own life and culture within the larger frame work, and it has stated that for this purpose such territorial areas or provinces should be constituted as far as possible on a linguistic and cultural basis."

तेव्हां हिंदुस्थानांतील ज्या लोकांना भाषावार प्रांतरचना करावी असें वाटतें, त्यांच्या मार्गांत कॉंग्रेसकडून कसलीच अडचण येणार नाहीं. तिच्याकडून जरूर ती मदतच त्यांना मिळेल. बेळगांव येथें आपल्या अध्यक्षतेखालीं भरणाऱ्या साहित्यसंमेलनानें या कामांत पुढाकार घेतला व त्यासाठीं मी वर म्हटल्याप्रमाणें एक सर्वसंमत योजना तयार करण्याचें ठरविलें, तर या कामांत मी व माझे सहकारी कॉंग्रेस-कार्यकर्ते व कॉंग्रेसजन यांच्याकडून संपूर्ण सहकार्य व सहाय्य मिळेल, एवढें आश्वासन मी आपल्याला देतों.

आपला
**शं. द. देव**

श्री० जेधे यांनीं दिलेल्या संमतीमुळें जो आनंद मला झाला होता, तो श्री. शंकरराव देव यांच्या या निस्संदिग्ध आश्वासनामुळें शतगुणित झाला. बेळगांव येथें विषयनियामक समितींतील चर्चेंत, माझ्या तीन ठरावांच्या आधारानें, प्रो. पोतदार, आचार्य अत्रे, श्री. श्री. शं नवरे, प्रो. माटे प्रभृति मंडळींच्या सूचनांनुसार एक विस्तृत ठराव तयार करण्यांत आला; व ता. १४ मे १९४६ रोजीं मीच तो खुल्या अधिवेशनांत मांडला. या ठरावाची अंमलबजावणी करण्या-

साठीं 'संयुक्त महाराष्ट्र समिति' नेमण्याचा आग्रह आचार्य अत्रे आणि श्री.श्रीपाद-राव नवरे यांनीं धरला.इतकेंच नव्हे, तर श्री.जेधे यांना समितीवर घेण्याची सूचना करून त्यांची त्या बाबतींत अनुमति मिळविण्याची हमीहि त्यांनीं आचार्यांनीं घेतली. या समितीची पहिली सभा ता. २६ मे रोजीं पुणें येथें भा. इ. सं. मंडळाच्या कार्यालयांत होऊन मुंबई येथें जुलै अखेर महाराष्ट्र एकीकरण परिषद श्री. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखालीं भरविण्याचें ठरलें. मध्यंतरीं, साहित्य-संमेलनाचें अधिवेशन संपल्याबरोबर, ता. १५ मे पासून ता. २५ मे पर्यंत मडगांव, पणजी, सावंतवाडी, मालवण आणि कोल्हापूर या ठिकाणीं दौरा काढून मी महाराष्ट्र एकीकरणाच्या कल्पनेचा प्रचार केला.

ता. २८ जुलै १९४६ रोजीं मुंबई येथें भरलेली महाराष्ट्र एकीकरण परिषद अनेक कारणांमुळें अतिशय गाजली आणि यशस्वीहि झाली. तिच्या यशाबद्दल आमचीं मनें शेवटच्या क्षणापर्यंत साशंक आणि सचिंत होतीं. कारण, या परिषदेंत मुंबईच्या प्रश्नावर अंतर्विरोध उत्पन्न होऊन ती मोडेल, असें भय क्षणोक्षणीं वाटत होतें; व कम्युनिस्ट पक्षाचें धोरण काय राहील, याचाहि भरंवसा वाटत नव्हता. ता. २५ रोजीं मी मुंबईला आल्याबरोबर परिषदेचे कार्यवाह श्री. श्रीपादराव नवरे आणि श्री. खंडेराव दौंडकर या दोघांनीहि मला या दुहेरी भीतीची कल्पना दिली; व स्वागतमंडळाच्या सदस्यांत कम्युनिस्टांचा बराच भरणा झालेला असल्याचें श्री. नवरे यांनीं सांगितलें. इतकेंच नव्हे, तर संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसंबंधींचा जो ठराव प्रो. पोतदार, आचार्य धर्मा-धिकारी आणि मी अशा तिघांनीं मिळून तयार केला होता, त्याला कम्युनिस्ट पक्षाकडून विरोध होण्याचा संभव आहे, असेंहि आमच्या कानावर आलें. कम्युनिस्टांच्या या संभाव्य विरोधाप्रमाणेंच मुंबई शहर ही महाराष्ट्राची राजधानी असावी, असा ठराव श्री. आप्पासाहेब खाडिलकर, श्री. मामासाहेब वरेरकर, श्री.प्रभाकर पाध्ये, श्री. लालजी पेंडसे प्रभृति मुंबईची मंडळी आणणार असून, त्या ठरावावर रणें माजतील, असा रंग दिसत होता. ता. २६ जुलै रोजीं सायंकाळीं प्रो. पोतदार, श्री. नवरे आणि मी असे आम्ही तिघे ज्या वेळीं स्वागताध्यक्ष श्री. स. का. पाटील यांना मुंबई कॉंग्रेस हौसमध्यें भेटलों, त्या वेळीं मुंबईचा प्रश्न परिषदेंत निघणें इष्ट होणार नाहीं, असें त्यांनीं आम्हांला निक्षून सांगितलें. उलट, ता. २७ रोजीं सायंकाळीं मुंबई मराठी साहित्यसंघाच्या कचेरींत श्री. केशव-

राव जेधे यांच्याशीं माझें आणि श्री. दौंडकर यांचें जें बोलणें झालें, त्यांत त्यांनीं मुंबईच्या बाबतींत कणखर धोरणाचा अवलंब केला पाहिजे, असा अभिप्राय व्यक्त केला. डॉ. अंबेडकर तर याच्याहि पुढें गेले. ता. २५ रोजीं सायंकाळीं श्री. नवरे आणि मी सिद्धार्थ कॉलेजांत त्यांना परिषदेचें निमंत्रण द्यावयाला गेलों असतां, त्यांनीं भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व हें राष्ट्रीयत्वाला मारक आहे, या विषयावर जवळ जवळ एक व्याख्यानच दिलें. तेव्हां, रशियाचें उदाहरण देऊन आम्ही त्यांना उलट असें सांगितलें कीं, " उत्तर हिंदुस्थानांत भाषावार प्रान्तरचना यापूर्वीच अंमलांत आलेली असून, आतां फक्त मुंबई, मध्यप्रान्त, वऱ्हाड आणि मद्रास या तीन प्रांतांपुरताच हा प्रश्न सुटावयाचा शिल्लक उरला आहे; व भाषेच्या तत्त्वावर या तीन प्रान्तांची पुनर्घटना करावयाला कॉंग्रेस वचनबद्ध झालेली आहे." त्यावर डॉक्टरसाहेबांनीं कॉंग्रेसश्रेष्ठींविषयीं अत्यंत अविश्वास प्रगट करून असे उद्गार काढले कीं, "छे, छे ! कॉंग्रेसश्रेष्ठींकडून महाराष्ट्राला कधींच न्याय मिळणार नाहीं ते तुम्हांला मुंबई मिळूं देणार नाहींत. आणि मुंबईशिवाय महाराष्ट्राला काय किंमत आहे ? खरोखरी तुम्ही अगदीं भलत्या वेळीं ही चळवळ करीत आहांत." (No, No. They wont give a fair deal to Maharashtra. They will never give you Bombay. And what is Maharashtra without Bombay ? I tell you, you have chosen the most inopportune time to start this movement.) मुंबई शहराच्या बाबतींत परिषदेनें निश्चित धोरणाचा अवलंब केला पाहिजे, या मुद्यावर श्री. केशवराव जेधे, श्री. शंकरराव मोरे, श्री. र. के. खाडिलकर प्रभृति महाराष्ट्र कॉंग्रेसचे कार्यकर्ते, श्री. रा. ब. सप्रे, आचार्य अत्रे, श्री. य. कृ. खाडिलकर, श्री. वरेरकर, श्री. लालजी पेंडसे, श्री. प्रभाकर पाध्ये, प्रा. वि. ह. कुलकर्णी, डॉ. भालेराव, श्री. आप्पा पेंडसे, श्री. चं. वि. बावडेकर प्रभृति मुंबईचे कार्यकर्ते, डॉ. अंबेडकर यांच्यासारखे महाराष्ट्राभिमानी पण उदासीन पक्षनेते आणि कम्युनिस्ट या सर्व निरनिराळ्या वृत्तींच्या आणि मतांच्या गटांचें आग्रही मतैक्य होतें; व या आग्रहाचा स्फोट होऊन जर परिषद मोडली, तर महाराष्ट्र एकीकरणाच्या कार्याला, घटनात्मक घडामोडींच्या या संधिकालांत, मोठाच अपशकुन होईल, अशी भीति आम्हांला

वाटली. या गटांपैकीं डॉ. अंबेडकर हे परिषदेला मुळीं हजरच राहाणार नव्हते; व श्री. जेधे, श्री. खाडिलकर प्रभृति काँग्रेस कार्यकर्ते हे काँग्रेसच्या शिस्तीनें बांधले गेलेले असल्यामुळें त्यांचा आग्रह, निदान श्री.शंकरराव देव हे अध्यक्ष असतांना तरी, एका मर्यादेपलिकडे जाण्याचा संभव नव्हता, याचीहि आम्हांला जाणीव होती. पण कम्युनिस्टांकडून मात्र मुंबईचा प्रश्न आणि मुख्य ठरावाचा मसुदा या दोन्ही बाबतींत वाद उत्पन्न केला जाण्याचीं चिन्हें दिसत होतीं. म्हणून, मी ता. २७ रोजीं रात्रीं श्री. श्री. अ. डांगे यांच्याशीं प्रथम फोनवर बोललों; व ता. २८ रोजीं सकाळीं त्यांना समक्ष भेटून त्यांच्याशीं ठरावासंबधीं चर्चा केली. आमच्या ठरावाच्या मसुद्यांत जो एकीकरणाचा क्रम दर्शविलेला होता, तो त्यांना तत्त्वतः अमान्य होता; व मुंबई शहराचा ठरावांत स्पष्ट निर्देश होणें अनेक दृष्टींनीं आवश्यक आहे, असेंहि त्यांचें म्हणणें होतें. पण, यांपैकीं कोणत्याहि मुद्यावर रणें माजून जर परिषद मोडली, तर ती खरोखरी कोणत्या कारणांमुळें मोडली याचा विचार कोणी करणार नाहीं आणि ' महाराष्ट्र एकीकरण परिषद मोडली ' असा गवगवा मात्र सर्वत्र होऊन त्यामुळें आपणा सर्वांना प्रिय असलेल्या या कार्याची हानि होईल, असें मी त्यांना परोपरीनें विनवून सांगितलें. तेव्हां त्यांनीं, " मी ठरावाला फक्त तात्त्विक संमति देईन, " असें लेखी आश्वासन मला दिलें; व आमची चिंता दूर केली.

अशा प्रक्षुब्ध वातावरणांतच ता. २८ जुलै रोजीं दुपारीं २ वा. ब्लॅव्हॅट्स्की लॉजमध्यें महाराष्ट्र एकीकरण परिषदेच्या प्रथमाधिवेशनाला प्रारंभ झाला. नागपूर, वऱ्हाड, मराठवाडा, गोमंतक वगैरे महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील निरनिराळ्या पक्षांचे, जातींचे, धर्मांचे आणि वर्गांचे नेते, कार्यकर्ते आणि प्रतिनिधि, शास्त्रज्ञ, पंडित आणि कवि, आचार्य, वीर आणि मुत्सद्दी व पत्रकार, उद्योगाधीश आणि तत्त्वज्ञानी परिषदेला हजर होते जणुं कांहीं महाराष्ट्राची संस्कृति, विद्वत्ता, संपत्ति, तपस्या, नेतृत्व आणि मुत्सद्देगिरी हीं सर्व संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेची प्रतिज्ञा करण्यासाठीं महाराष्ट्र एकीकरणाच्या त्या विशाल व्यासपीठावर सम्मीलित झालीं होतीं! तें भव्य दृश्य पाहून त्या शंकाकुल मनःस्थितींतहि श्री. नवरे, श्री. पर्वते, श्री. दौडकर, डॉ. भालेराव श्री. आप्पा पेंडसे प्रभृति आम्हां परिषदेच्या कार्यवाहांना जो आनंद झाला, तो केवळ अवर्णनीय होय. १९४० च्या मेमध्यें नागपूरचे कायदेपंडित श्री.

नानासाहेब केदार यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्र एकीकरण परिषद, मुख्यतः आम्हां मंडळींच्या प्रयत्नानेंच, पुणें येथें 'संयुक्त महाराष्ट्र सभे' तर्फे भरली होती. पण, ती परिषद म्हणजे जणुं पक्षभेदमूलक उपेक्षेच्या वाळवंटांत जिरून लुप्त झालेली फल्गु नदी आणि ही परिषद म्हणजे जणुं भगीरथाच्या प्रार्थनेनें प्रसन्न होऊन भूतलावर अवतीर्ण झालेली देव-गंगा! या यशाचें श्रेय अर्थातच श्री. शंकरराव देव यांच्या नेतृत्वालाच बव्हंशीं दिलें पाहिजे. १९२५ सालापासून त्यांच्या राजकीय नेतृत्वाचा विकास मी पहात आलों होतों; व तेव्हांपासून दुर्दम ध्येयनिष्ठा, अंगीकृत कार्यासाठीं वाटेल ते कष्ट सोसण्याची आणि त्याग करण्याची तयारी, संसारांतील सर्व प्रकारच्या मोहांना तुच्छ लेखणारें धगधगीत चारित्र्य आणि महाराष्ट्राच्या बाण्याला शोभेल अशी निःस्पृह कणखर वृत्ति या त्यांच्या गुणविशेषांमुळें मला त्यांच्याविषयीं आदरहि विशेष प्रकारचा वाटत असे. म्हणून, माझ्या नेहमीं असें मनांत येई कीं, त्यांनीं जर महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न हातीं घेतला, तर कॉंग्रेसच्या राजकारणांत त्याला प्रतिष्ठा प्राप्त होऊन तो खात्रीनें सुटण्याच्या मार्गाला लागेल. त्यामुळें, १९४२ च्या मेमध्यें आणि पुन्हा १९४५ च्या डिसेंबरमध्यें ते नागपुरास आले असतां मी त्याना मुद्दाम भेटून या प्रश्नांत मन घालण्याची विनंति केली होती. पण, राष्ट्रीय स्वातंत्र्याचा मुख्य प्रश्न सुटलेला नसल्यामुळें अद्याप ही चळवळ सुरू करण्याची वेळ आलेली नाहीं, असें सांगून दोन्हीहि वेळां त्यांनीं माझ्या विनंतीला नकार दिला होता. त्यांनीं सांगितलेलें हें कारण मला अर्थातच पटलें नाहीं. कारण, बिहार, सिंध, सीमा आणि ओरिसा हे चार नवे भाषावार प्रान्त माझ्या डोळ्यांसमोर अस्तित्वांत आलेले मी पाहिले होते; आंध्र आणि कर्नाटक यांची स्वतंत्र प्रांतघटनेची चळवळ डॉ. पट्टाभिसीतारामय्या आणि श्री. दिवाकर यांच्यासारख्या त्या त्या प्रांतांतील कॉंग्रेसनेत्यांनीं किती ईर्ष्येनें चालविलेली आहे हेंहि मला दिसत होतें; व १९३८ सालीं कराची येथें भरलेल्या गुजरात साहित्यसंमेलनाच्या व्यासपीठावरून, गुजरातचे राष्ट्रकवि श्री. अर्देसर खबरदार यांच्या 'ज्यां ज्यां वसे एक गुजराती त्यां त्यां सदाकाळ गुजरात' या आक्रमक गर्जनेचा अनुवाद करून, श्री. कन्हयालाल मुन्शी यांनीं केलेली महागुजरातची घोषणाहि माझ्या कानांत दुमदुमत होती. अशा स्थितींत शंकररावजींनीं दुवार दिलेला नकार ऐकून मला जर त्यांचा राग आला असला, तर त्यांत काय

नवल ? बेळगांवचें अध्यक्षीय भाषण लिहितांना त्यांच्या त्या नकाराविषयींचा राग आणि उद्वेग हे दोन्ही माझ्या लेखणींतून नुसते रसरसत होते. पण, आज तेच शंकररावजी, अखिल महाराष्ट्रांतील सर्व जातींच्या आणि सर्व पक्षांच्या जनतेच्या वतीनें, संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेची घोषणा करावयाला उभे राहिलेले पाहून मला कृतज्ञता आणि धन्यता वाटली ! या परिषदेंत ' संयुक्त महाराष्ट्र परिषदे 'ची स्थापना होऊन ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर, म. म. प्रो. द. वा. पोतदार, श्री. ध. रा. गाडगीळ, श्री. केशवराव जेधे, श्री. दा. वि. गोखले, श्री. श्री. शं नवरे, श्री. श्री. अ. डांगे, श्री. ब्रिजलाल बियाणी, श्री. आनंदराव वाघमारे, डॉ. पंजाबराव देशमुख, श्री. खं. सा. दौंडकर, श्री. त्र्यं. वि. पर्वते प्रभृति अखिल महाराष्ट्रांतील निरनिराळ्या पक्षांच्या कार्यकर्त्यांचा तींत समावेश करण्यांत आला; व श्री. शंकरराव देव यांच्या नेतृत्वाखालीं महाराष्ट्र एकीकरणाची चळवळ उत्साहानें सुरू झाली.

पण, या परिषदेंत संयुक्त महाराष्ट्राच्या तत्वाला संमति देतांना डॉ. पंजाबराव देशमुख आणि सौ प्रमिला ओक यांनीं महाविदर्भाच्या स्वायत्ततेचा जो प्रश्न उपस्थित केला होता, त्यानें भारतीय घटनासमितीच्या अधिवेशनाला सुरुवात होण्याच्या सुमारास जोरानें डोकें वर काढलें. डॉ. पंजाबराव देशमुख यांनीं आपल्या भाषणांत असें सूचित केलें होतें कीं, महाराष्ट्र एकीकरणाचें तत्त्व जरी आम्हांला मान्य असलें, तरी मध्यप्रान्त—वऱ्हाडांतील आठ जिल्ह्यांच्या महाविदर्भाचें वैशिष्टय लक्षांत घेऊन त्याला स्वायत्तता देण्यांत यावी. म्हणून, नागपूर आणि वऱ्हाड प्रांतांतील कार्यकर्त्यांशीं समक्ष चर्चा करून या प्रश्नासंबंधींचे त्यांचे विचार समजावून घ्यावेत व महाविदर्भाचें वैशिष्टय कायम राखून त्याला संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट होतां येईल अशा कांहीं योजनाहि त्यांच्यापुढें मांडाव्यात, या उद्देशानें ता. २७ ते ३० ऑक्टोबरपर्यंत श्री. शंकरराव देव आणि श्री. ध. रा. गाडगीळ यांनीं श्री. पुनमचंद राका, आचार्य दादा धर्माधिकारी, श्री. प्र. श्री. पटवर्धन प्रभृति मंडळीसह गोंदिया, नागपूर, अमरावती आणि अकोला या शहरीं दौरा काढला. या दौऱ्यात श्री. ध. रा. गाडगीळ यांनीं तयार केलेल्या ' संयुक्त महाराष्ट्र ' आणि ' हिंदी संघराज्याचे घटक प्रांत ' या दोन टिपणींवर चर्चा झाली. या दौऱ्यामुळें महाराष्ट्र एकीकरणासंबंधींचे अविश्वास आणि भीति यांच्या पोटीं उद्भवलेले कांहीं

गैरसमज जरी थोडे कमी झाले, तरी वादाचा मुख्य प्रश्न कांहीं निकालांत निघाला नाहीं; व ता. १३ एप्रिल १९४७ रोजीं जळगांव येथें संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या प्रतिनिधिसभेचें जें प्रथमाधिवेशन झालें, त्यांत वऱ्हाडच्या प्रश्नाची पुन्हा सर्व बाजूंनीं छाननी करण्यांत आली. विशेषतः, वऱ्हाडवर स्वारी करून निजाम त्याचा कब्जा घेणार असल्याच्या ज्या बातम्या त्या सुमारास उठल्या होत्या आणि त्याहिपेक्षां निजामचे त्या वेळचे दिवाण सर मिर्झा इस्माईल यांनीं त्याच आठवड्यांतील आपल्या वऱ्हाडांतल्या दौऱ्यांत निजामाच्या त्याच्यावरील सार्वभौम अधिराज्याची जी घोषणा निस्संदिग्ध रीत्या केली होती, तिच्यामुळें वऱ्हाडच्या राजकीय भवितव्याविषयीं सर्वांचींच मनें अतिशय सचिंत झालेलीं होतीं. त्या चिंतातुर वातावरणामुळेंच कीं काय, महाराष्ट्र एकीकरणाविषयीं एरवीं सामान्यतः अनुत्सुक असलेले आणि 'वऱ्हाडसाठीं वऱ्हाड' या कल्पनेंत गुंगलेले वऱ्हाडांतील साऱ्या पक्षांचे प्रमुख कार्यकर्ते या परिषदेला हजर राहिले; व वऱ्हाड-निजाम प्रश्नाच्या चर्चेंत बॅ. रामराव देशमुख, श्री. रा. अ. कानिटकर, श्री. ब्रिजलाल बियाणी, श्री. द. कृ. काणे, डॉ. पंजाबराव देशमुख, श्री. व्यं. के. सोमण, श्री. ना. रा. बामणगांवकर, सौ. प्रमिला ओक प्रभृति मंडळींनीं मोकळ्या मनानें भाग घेतला. परिषदेनें वऱ्हाडसंबंधींचा ठरावहि अत्यंत स्पष्ट आणि निर्णायक असा केला. या ठरावावर खुल्या अधिवेशनांत केलेल्या भाषणांत बियाणी, पंजाबराव देशमुख, सोमण, ओक, बामणगांवकर प्रभृति वैदर्भीय प्रतिनिधींनीं संयुक्त महाराष्ट्राविषयींची आपली निष्ठा उद्घोषित केली. पण, या निष्ठेचें प्रदर्शन करीत असतांनाहि, खुल्या अधिवेशनांत काय किंवा विषयनियामक समितींत काय, विदर्भ आणि महाविदर्भ यांची स्वायत्तता, महाराष्ट्र एकीकरण झाल्यानंतरहि, कोणत्या ना कोणत्या तरी स्वरूपांत कायम राहिली पाहिजे, हा आग्रह व्यक्त झाल्याविना राहिला नाहीं. इतकेंच नव्हे, तर त्यानन्तर आठच दिवसांनीं, ता. २० एप्रिल १९४७ रोजीं, वऱ्हाडच्या प्रश्नासंबंधीं चळवळ करण्यासाठीं म्हणून जी वऱ्हाड सर्वपक्षीय परिषद श्री. बियाणी यांच्या नेतृत्वाखालीं अकोला येथें स्थापन झाली, तिच्या उद्दिष्टाबद्दलहि नाना प्रकारचे वाद-प्रवाद उत्पन्न होऊन, विदर्भाच्या स्वायत्ततेविषयींचा आग्रह ही एक, कांहीं जाणकारांच्या मतें, शंकास्पद आणि आक्षेपार्ह राजकीय समस्या होऊन बसली.

त्यामुळें, घटनासमितीनें भाषावार प्रांतरचनेचा विचार करण्यासाठीं जी उपसमिति नेमली होती, तिच्या कामाला प्रारंभ होतांच हा महाविदर्भाचा प्रश्न समाधानकारक रीतीनें निकालांत काढणें अवश्य होऊन बसलें. या उपसमितींत विदर्भ प्रांतिक कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ब्रिजलाल बियाणी आणि डॉ. पंजाबराव देशमुख हे दोघेहि आहेत; व त्यांनीं समितीच्या प्रत्येक बैठकींत संयुक्त महाराष्ट्राबरोबरच महाविदर्भाचाहि प्रश्न पुढें रेटण्याच्या धोरणाचा अवलंब केला. आंध्र, कर्नाटक, केरळ, गुजरात, महाकोसल वगैरे ज्या प्रान्तांच्या भाषावार पुनर्घटनेची मागणी या समितीपुढें होती, त्यांपैकीं कोणत्याहि प्रान्तांतून एकभाषी प्रान्ताचे दोन प्रान्त करण्याचा सूर या समितींत कधीं निघाला नाहीं. पण, संयुक्त महाराष्ट्राच्या मागणीच्या बाबतींत मात्र वारंवार द्विधा मनोवृत्ति प्रकट होऊं लागली विशेषतः, आंध्र, कर्नाटक, केरळ आणि महाराष्ट्र यांच्या भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न घटनासमिती विचारांत घेणार अशी घोषणा जेव्हां ता. २२ जून १९४७ रोजीं आंध्रनेते डॉ. पट्टाभिसीताराम अय्या यांनीं दिल्लीहून केली, तेव्हां श्री. ब्रिजलाल बियाणी प्रभृति महाविदर्भवादी कार्यकर्त्यांना, श्री. शंकरराव देव यांच्या भिडेमुळें, आजपर्यंत तितकें स्पष्ट बोलून दाखविणें इष्ट न वाटलेलें आपलें हृद्गत आतां प्रदर्शित करणें अवश्य वाटलें; व जुलैच्या पहिल्या आठवड्यांत नागपूर प्रान्तिक कॉंग्रेसचे कार्यवाह श्री.मा.सा.कन्नमवार आणि श्री. मदनगोपाल अग्रवाल यांनीं जाहीर पत्रक काढून संयुक्त महाराष्ट्राऐवजी महाविदर्भ प्रांत निर्माण करण्याची मागणी केली. या पत्रकांत विदर्भ प्रान्तिक कॉंग्रेसचे अध्यक्ष श्री. ब्रिजलाल बियाणी यांनीं संयुक्त महाराष्ट्राच्या योजनेचा आग्रह सोडून देऊन महाविदर्भाचा प्रश्न हातीं घ्यावा, अशीहि सविनय प्रार्थना या कार्यवाहद्वयानें त्यांना केली होती. त्या प्रार्थनेचा प्रतिध्वनि अगदीं ताबडतोब उठला. कारण, ता. ५ जुलै १९४७ रोजीं भरलेल्या विदर्भ प्रान्तिक कॉंग्रेस कमिटीच्या सभेंत "मराठीभाषी प्रदेशाचे दोन प्रान्त करावेत व महाविदर्भाचा स्वतंत्र प्रान्त बनवावा," अशी निश्चित मागणी ठरावरूपानें करण्यांत आली. इतकेंच नव्हे, तर श्री. ब्रिजलाल बियाणी, डॉ. पंजाबराव देशमुख, सौ. प्रमिला ओक प्रभृति संयुक्त महाराष्ट्र परिषदेच्या कार्यकारी मंडळांत असलेले वैदर्भीय कार्यकर्ते परिषदेच्या सदस्यत्वाचा राजीनामा देणार असल्याचें वृत्तहि नागपूरच्या हिन्दी वर्तमानपत्रांतून फडकलें. संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीवर हें मोठेंच गंडांतर

होतें; व द्विधा मनोवृत्तीच्या प्रदर्शनांतून उत्पन्न झालेल्या या नाजूक पेंचांतून कश रीतीनें मार्ग काढावा, हें आम्हांला समजेना. शेवटीं, बॅ. रामराव देशमुख यांन पत्र घालून या प्रकरणांत मध्यस्थी करण्याबद्दल विनंती करावयाची, असें मं विचाराअन्तीं आपल्या मनाशीं ठरविलें. ता. २८ जानेवारी १९४० रोजीं र्ज पहिली 'संयुक्त महाराष्ट्र सभा' श्री. ग. वि. पटवर्धन, प्रो. द. वा. पोतदार श्री. दा. वि. गोखले, श्री. श्री. शं. नवरे, श्री. त्र्यं. वि. पर्वते, श्री. शं. न आगाशे प्रभृति आम्ही मंडळींनीं मुंबईस स्थापन केली होती, तिचे बॅ. देशमुख हे अध्यक्ष होते; व ते महाविदर्भाचे अभिमानी असले, तरी संयुक्त महाराष्ट्राच्य बाबतींतील त्यांची निष्ठा अचल आणि अव्यभिचारी असल्याबद्दल माझी खात्री होती. त्याचप्रमाणें ते मनाचे खोल, मुद्याच्या बाबतींत मितभाषी पण एकद विचारपूर्वक मत दिल्यावर स्वतःच्या शब्दाला जागणारे प्रामाणिक मुत्सद्दी असून वऱ्हाडांतील सर्वच पक्षोपपक्षांवर त्यांचें वजन आहे असाहि माझा अनुभव होता. म्हणून, संयुक्त महाराष्ट्राच्या प्रश्नासंबंधीं विदर्भांत उत्पन्न झालेल्या य परिस्थितीची सविस्तर माहिती देऊन या बिकट परिस्थितींतून मार्ग काढण्याच्य बाबतींत शंकररावजींना मदत करण्याची विनंति मी त्यांना पत्र लिहून केली या पत्रावर माझ्या जोडीला महाविदर्भ सभेचे कोषाध्यक्ष 'महाराष्ट्र'चे संपादक श्री. बाळासाहेब ढवळे आणि कार्यवाह श्री. ए. श्री. पटवर्धन यांच्या सह्या होत्या; व माझ्या सूचनेनुसार 'उदय'चे संपादक श्री. नाना-साहेब बामणगांवकर यांनींहि रामरावांना तांतडीनें पत्र घालून तडजोड घडवून आणण्याची विनंति केली. श्री. शंकरराव देव यांच्याकडेहि मी रामरावांना घातलेल्या या पत्राची प्रत पाठविली. सुदैवानें रामराव त्या वेळीं दक्षिण आफ्रि-केंतील राजकारणासंबंधीं कांहीं बोलणें करण्यासाठीं दिल्लीला आलेले होते. त्यामुळें माझें पत्र पोंचतांच श्री. शंकरराव देव यांनीं मला तार करून दिल्लीस बोला-विलें. ता. १४ जुलै रोजीं त्यांच्या निवासस्थानीं श्री. ब्रिजलाल बियाणी, डॉ. पंजाबराव देशमुख, बॅ. रामराव देशमुख प्रभृतींची बैठक होऊन या प्रश्नाचा निर्णय सामोपचारानें लावण्यासाठीं ता. ७ ऑगस्ट १९४७ रोजीं अकोला येथें नागपूर, विदर्भ आणि महाराष्ट्र या संयुक्त महाराष्ट्राच्या तीन भागांतील प्रमुख कार्यकर्त्यांची सभा श्री. देव आणि श्री. बियाणी यांनीं बोलवावी, असें ठरलें. यानंतर लगेच शंकररावजींच्या आदेशानुसार मी पुण्याला जाऊन प्रो. पोतदार,

श्री. ध. रा. गाडगीळ, श्री. दा. वि. गोखले आणि परिषदेचे प्रांतिक संघटक डॉ. य. कृ. सोवनी यांना अकोला येथील सभेंत कोणत्या मुद्यांवर बाटाघाटी होण्याचा संभव आहे, हें सांगितलें; व त्या दृष्टीनें त्या सभेपुढें ठेवण्यासाठीं उपप्रान्ताची योजना तयार करण्याची विनंती श्री. ध. रा. गाडगीळ यांना केली-तदनुसार श्री. गाडगीळ यांनीं 'नवीन प्रांतरचना' आणि 'उपप्रांताचे सत्ताधिकार' हीं दोन टिपणें तयार करून अकोल्यास आणलीं. या टिपणांवर ता. ७ आणि ८ ऑगस्ट रोजीं तपशीलवार चर्चा होऊन संयुक्त महाराष्ट्राच्या घटनेसंबंधीं सर्वानुमतें निर्णायक ठराव झाला. या ठरावांत महाविदर्भाबरोबरच बृहन्मुंबई, गोमंतक वगैरे महाराष्ट्राच्या इतरहि विशिष्ट घटकांना, अवश्य आणि व्यवहार्य दिसल्यास, उपप्रांताचा दर्जा देण्याची व्यवस्था करून ठेवलेली आहे. अशा रीतीनें, संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेच्या मार्गांतील एक मोठी अंतर्गत अडचण दूर होऊन, घटनासमितींत या प्रश्नासंबंधीं एकमुखी धोरण स्वीकारलें जाण्याची शक्यता उत्पन्न झाली; व तिचा फायदा घेऊन जळगांवच्या अधिवेशनाचे स्वागताध्यक्ष श्री. ह. वि. पाटसकर यांनीं भाषावार प्रान्तरचनेसंबंधींचा ठरावहि हिंदी पार्लमेंटपुढें आणण्याचा प्रयत्न केला. हा ठराव जरी पार्लमेंटपुढें येऊं शकला नाहीं, तरी त्या निमित्तानें झालेल्या प्रश्नोत्तरांच्या वेळीं हिंद सरकारचे मुख्य प्रधान पं. जवाहरलाल नेहरू यांनीं भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाची चौकशी करण्यासाठीं कमिशन नेमण्याची घोषणा केल्यामुळें, श्री. पाटसकर यांच्या प्रयत्नाचें एका परीनें सार्थक झालें, असें म्हणतां येईल.

"संयुक्त महाराष्ट्रासंबंधीं तुमची कल्पना काय आहे?—" असा प्रश्न मला अनेकदां विचारला जातो. आणि त्याचें मर्म उघड आहे. तें असें कीं, महाराष्ट्राच्या एकात्मतेसंबंधीं माझ्या कल्पना आणि अपेक्षा काय आहेत? 'संयुक्त महाराष्ट्र' या शब्दप्रयोगानें मला महाराष्ट्राचें फक्त प्रादेशिक आणि राजकीय एकीकरण अपेक्षित आहे कीं त्यासंबंधीं माझ्या आणखी कांहीं विशेष कल्पना आहेत? प्रस्तुत संग्रहांतील भाषणांत संयुक्त महाराष्ट्राविषयींच्या माझ्या बहुतेक कल्पना आणि अपेक्षा व्यक्त झालेल्या आहेत तथापि, गेलीं दहा वर्षें साहित्याच्या व्यासपीठावरून आणि अलीकडे चार वर्षें 'तरुण भारत' दैनिकांतूनहि या

एकाच कल्पनेचा पुरस्कार मी सतत करीत आलेलों असल्यामुळें या बाबतींतील माझी भूमिका पुनश्च विशद करणें इष्ट होईल, असें मला वाटतें.

मी ' महाराष्ट्र ' हा एक ' प्रांत ' (Province) किंवा नुसता ' मराठीभाषी प्रदेश ' ( Marathi speaking area ) समजत नाहीं; तर ' भारतीय राष्ट्रकुटुंबां ' तील ( Commonwealth of Indian Nations ) तें एक पृथगात्म ' राष्ट्र ' ( Nation ) आहे अशी माझी निष्ठा असून, त्याची प्रकृति, संस्कृति आणि नियति या इतिहाससिद्ध आहेत, अशी माझी श्रद्धा आहे. जगामध्यें ब्रिटिश आणि रशियन अशीं दोन बलाढ्य आणि स्पर्धिष्णु राष्ट्रकुटुंबें आज अस्तित्वांत असून, मध्य आशियांत सध्यां चालू असलेल्या संघर्षांतून केवळ धर्माधिष्ठित ( Theocratic ) अशा तिसऱ्या मुस्लिम राष्ट्रकुटुंबाचा उद्भव लवकरच होईल, अशीं चिन्हें दिसत आहेत. मध्य आशियांत स्थापन झालेल्या अरब राष्ट्रसंघांत जरी अद्याप पाकिस्तान, इराण, अफगाणिस्तान, तुर्कस्तान वगैरे कांहीं मुस्लिम राष्ट्रें सामील झालेलीं नसलीं, तरी कराचीपासून कैरो ते कॉन्स्टंटिनोपलपर्यंत पसरलेल्या या इस्लामी राष्ट्रांची जाज्वल्य धर्मनिष्ठा, तज्जन्य परस्पर सहानुभूति आणि पाश्चात्य साम्राज्यशाहीच्या पाशांतून मुक्त होण्याची अनिवार्य आतुरता या कारणांमुळें समान धार्मिक आणि आर्थिक हितसंबंधांनीं निगडित झालेला त्यांचा तिसरा धर्मप्रधान गट निर्माण व्हावा, हें अगदीं स्वाभाविक आहे. किंबहुना, पॅलेस्टाइनमध्यें उद्यांपासून सुरू होणार असलेलें ' जिहाद ' ही मध्य आशियांतील या मुस्लिम राष्ट्रकुटुंबाच्या जन्माची प्रसववेदना ठरावी, असा योग दिसतो. जागतिक राजकारणांतील अमेरिकेची प्रतिष्ठा आणि प्रभाव हीं जरी एका परीनें फक्त रशियाशींच तुल्य अशीं असलीं, तरी भाषा, संस्कृति आणि हितसंबंध यांच्या साधर्म्यामुळें मी अमेरिकेचा अंतर्भाव ब्रिटिश राष्ट्रकुटुंबांतच करितों. जगांतील या तीन राष्ट्र-कुटुंबांप्रमाणेंच स्वतंत्र भारतानें जर योग्य आंतरसांस्कृतिक आणि आंतरराष्ट्रीय धोरणाचा अवलंब, विशाल दूरगामी दृष्टीनें, केला, तर आशिया खंडांत लवकरच भारतीय राष्ट्रकुटुंबाचा उदय होईल; व या भारतीय कुटुंबांत आग्नेय आणि अतिपूर्व आशियांतील हिंदु, बौद्ध आणि कदाचित् मुस्लिम अशीं तिन्ही धर्मांचीं राष्ट्रें हळुहळू समाविष्ट होतील, अशी मला खात्री वाटते. विशेषतः, आग्नेय आशियांतील सीलोन, ब्रह्मदेश, सयाम, नेपाळ, तिबेट, इंडोनेशिया वगैरे राष्ट्रकें हीं अगदीं नजीकच्या

भविष्यकालांत भारतीय संघराज्याशीं संलग्न होतील, याबद्दल मला मुळींच शंका नाहीं. कारण, सांस्कृतिक दृष्ट्या हीं सारीं राष्ट्रें भारताचीं संतानें असून, हिंदी महासागरांतील सर्वांत समृद्ध, संपन्न आणि शक्तिशाली असें जें भरतखंड, त्याला बिलगल्याशिवाय त्याच्या भोंवतालच्या या राष्ट्रांचें संवर्धन आणि संरक्षण होणें शक्य नाहीं. सुदैवानें, हिंद सरकारनें आपलें राष्ट्र आणि राज्य हें धर्मनिरपेक्ष ( Secular ) राहील असें जाहीर केलेलें असल्यामुळें त्याच्या भोंवतालच्या विधर्मीय राष्ट्रांनाहि भारतीय राष्ट्रकुटुंबांत निस्संकोच प्रवेश करतां येईल. या उदयोन्मुख भारतीय राष्ट्रकुटुंबाचें जें भव्य चित्र माझ्या डोळ्यांपुढें या क्षणीं उभें आहे, तें असें कीं, प्रशांत महासागराच्या उत्तुंग लाटांवर भारत-माता आरूढ झालेली आहे आणि त्या लाटांवर हेलावणारी आशियांतील छोटीं मोटीं राष्ट्रें चारी बाजूंनीं तिच्या अंगाला बिलगलेलीं आहेत !

हिन्दुस्थानाची विशिष्ट भौगोलिक परिस्थिति आणि त्याचा सांस्कृतिक प्रभाव या दोन कारणांमुळें दक्षिण आशियांत त्याला जें हें महत्त्व प्राप्त होण्याची सु-शक्यता आहे, त्याची ब्रिटिश मुत्सद्यांना पूर्ण जाणीव असल्यामुळेंच, आग्नेय आशियाचें नेतृत्व हिंदुस्थानानें स्वीकारावें, असा प्रचार ' मँचेस्टर गार्डियन ' सारखीं ब्रिटिश वृत्तपत्रें आज उत्साहानें करतांना दिसतात. या त्यांच्या उत्साहाचें मर्म अगदीं उघड आहे त्यांची अपेक्षा अशी कीं, भूमध्य समुद्रापासून प्रशान्त महासागरापर्यंत पश्चिमेकडून पूर्वेकडे ब्रिटनचें जें साम्राज्य पसरलेलें आणि विखुर-लेलें आहे, त्याच्या रक्षणाची जबाबदारी हिंदुस्थानानें उचलावी व या सद्-कार्याचा मोबदला म्हणून ब्रिटिश सरकारच्या पूर्वेकडील व्यापार–व्यवहारांत त्यानें भागीदार व्हावें. आज पराभूत जपानचा अपवाद सोडल्यास आशियांतील सारीं राष्ट्रें औद्योगिक आणि लष्करी दृष्ट्या अप्रगत, अरक्षित अवस्थेंत आहेत. त्यांच्या पुनर्घटनेच्या मिषानें ब्रिटनला त्यांच्यावर आणखी पंचवीस वर्षें आर्थिक आणि राजकीय वर्चस्व गाजवितां येईल. या वर्चस्वांत हिंदुस्थानानें वाटेकरी व्हावें म्हणजेच त्यानें ब्रिटिश साम्राज्यशाहीचें आशियांतील हस्तक व्हावें, या हेतूनें त्याला आग्नेय आशियाचा नेता बनविण्याची खुशामती भाषा ब्रिटिश वृत्तपत्रें सध्यां वापरीत आहेत. पण, या साम्राज्यशाही कारस्थानांत हिन्दुस्थान भागी-दार झाल्यास त्याला आपला कच्चा आणि पक्का असा दोन्ही प्रकारचा माल या मागासलेल्या देशांना पुरवावा लागेल; व त्या निर्गत व्यापाराचें पर्यवसान

परदेशीयांची पिळवणूक आणि स्वकीयांची उपासमार यांत होईल. माझ्या डोळ्यांपुढें जी भारतीय राष्ट्रकुटुंबाची कल्पना आहे, तींत कोणाचेंच कोणत्याहि प्रकारचें वर्चस्व किंवा शोषण अपेक्षित नाहीं; तर समान हितसंबंध आणि तदनुषंगिक सहकार्य एवढेंच फक्त गृहीत धरलेलें आहे. किंबहुना, ब्रिटिश राष्ट्रकुटुंब, सोव्हिएट राष्ट्रकुटुंब आणि मुस्लिम राष्ट्रकुटुंब यांच्या तत्त्वप्रणालींचे आणि धोरणाचे जे दुष्परिणाम आज जग भोगीत असलेले आपण प्रत्यक्ष पहात आहोंत, ते लक्षांत घेता भारतीय राष्ट्रकुटुंबानें आपली विशिष्ट तत्त्वप्रणाली आणि धोरण यांच्या जोरावर जागतिक राजकारणाला नवें शांतिप्रद वळण लावावें, अशी माझी आकांक्षा आहे.

मार्क्सवादांतून आविर्भूत झालेली रशियाची वर्गीय हुकूमशाही आणि जगांतील मागासलेल्या राष्ट्रांच्या शोपणासाठीं अजूनहि धडपडत असलेली ब्रिटनची पाश्चात्य लोकशाही यांच्यांतील तीव्र खुनशी स्पर्धा हें सध्यांचें जागतिक राजकारण आहे; व या राजकारणाचा प्रकोप अखेर महायुद्धांत झाल्याविना राहणार नाहीं, अशीं लक्षणें दिसत आहेत. पाश्चात्य लोकशाही आणि मार्क्सवाद या दोन्ही राजकीय तत्त्वप्रणाली मानवी विकासाच्या दृष्टीनें सदोष आणि अपूर्ण आहेत, याबद्दल आतां फारशी कोणाला शंका उरलेली नसेल. कारण, व्यक्तिमात्राचें पारतंत्र्य आणि पिळणूक हीं दोन्ही नष्ट करून मनुष्याचा पूर्ण विकास व्हावयाला अनुकूल अशी सामाजिक आणि आर्थिक परिस्थिति निर्माण करण्याच्या दृष्टीनें वर्गीय हुकूमशाही आणि पाश्चात्य लोकशाही या दोन्हीहि अपुऱ्या ठरलेल्या आहेत. मानवी व्यक्तित्वाच्या उन्नतीपेक्षां राष्ट्रीय किंवा वर्गीय उत्कर्षावरच त्यांचा भर जास्त असल्यामुळें आज या दोन्हीहि राजवटींत मनुष्याचा सारखाच कोंडमारा चालू असल्याचें दृष्टीस पडतें. मनुष्याच्या व्यक्तित्वाचा पूर्ण आणि प्रसन्न विकास हेंच सर्व जीवनाचें, सर्व राजकारणाचें आणि समाजकारणाचें एकमेव साध्य असलें पाहिजे; व हें साध्य ज्या साधनांनीं प्राप्त करून घ्यावयाचें, तीं साधनेंहि शुचि आणि श्रेयस्कर असलीं पाहिजेत. अशा प्रकारच्या साध्यसाधनांनीं युक्त असलेली सुसंस्कृत लोकशाही जगांत स्थापन करण्याचें विशाल ध्येय जर भारतीय राष्ट्रकुटुंबानें आपल्यापुढें ठेवलें, तर मनुष्याच्या आत्मिक, बौद्धिक आणि भौतिक विकासाला आवश्यक असलेलें स्वास्थ्य आणि शांति हीं दोन्ही संपादन करण्याचा मार्ग त्याला जगाला दाखवितां येईल.

अशा या भारतीय राष्ट्रकुटुंबांत महाराष्ट्राला त्याची इतिहाससिद्ध प्रकृति, संस्कृति आणि निर्गति यांना शोभेल असें स्थान प्राप्त व्हावें व त्याच्या राष्ट्रीय अस्मितेचा पूर्ण विकास व्हावा, हें माझें जीवनस्वप्न आहे. अर्थात् हें स्वप्न सफल व्हावयाचें, म्हणजे महाराष्ट्राचें केवळ प्रादेशिक एकीकरण होऊन चालणार नाहीं; तर प्रादेशिक, राजकीय आणि सामाजिक दृष्ट्या छिन्नभिन्न होऊन गेलेल्या आजच्या खंडित, विकल महाराष्ट्रांतून, ज्याच्या राष्ट्रीय जीवनां-तून जाति आणि वर्ग यांचा समूळ निःपात झालेला आहे, असा एकसंध, एकात्म महाराष्ट्र प्रथम आविर्भूत झाला पाहिजे. सह्याद्रि आणि सातपुडा या शैलश्रेणींनीं जसा महाराष्ट्र विभागला गेलेला आहे, त्याचप्रमाणें जातिभेदानेंहि तो विभागला गेलेला असून, ( १ ) ब्राह्मण, ( २ ) ब्राह्मणेतर, ( ३ ) अस्पृश्य आणि ( ४ ) वन्य हे महाराष्ट्रांतील चार मुख्य लोकघटक आज परस्परांपासून विभक्त असें जीवन, एकाच भूमींत राहून आणि एकाच भाषेंत व्यवहार करीत, कसेंबसें कंठीत आहेत; व महाराष्ट्रांतील सारी संपत्ति आणि तिच्या उत्पादनाचीं साधनें महाराष्ट्रीयेतराच्या मुठींत गेलेलीं असून, त्याची ही बुद्धिजीवी आणि श्रमजीवी चतुर्विध प्रजा आपल्या मायदेशांत केवळ कारकून आणि कामगार होऊन बसलेली आहे. ही दैन्यावस्था नष्ट होऊन अखिल महाराष्ट्रांत एकसंध आणि एकात्म अशा मराठी जनतेचे लोकराज्य स्थापन होणें म्हणजेच संयुक्त महाराष्ट्र निर्माण होणें होय; व असा संयुक्त महाराष्ट्रच भारतीय राष्ट्रकुटुंबांतील आपलें इतिहाससिद्ध स्थान घेऊन त्याच्या उत्कर्षाला हातभार लावूं शकेल, अशी माझी श्रद्धा आहे. ही क्रांति शक्य तर समन्वयाच्या, नाहीं तर विग्रहाच्या, मार्गानें शक्य तितक्या लवकर घडवून आणल्याशिवाय गत्यंतर नाहीं, असें मला मनःपूर्वक वाटतें.

मुंबई शहराच्या भवितव्याचा प्रश्न हें या क्रान्तीचें प्रतीक आहे, असें मी समजतों; व म्हणून मुंबई महाराष्ट्रांत रहावयाची कीं महाराष्ट्रांतून बाहेर काढली जावयाची या प्रश्नावर रणें माजल्याशिवाय रहाणार नाहींत, अशी मला भीति वाटते. मुंबई हें महाराष्ट्राच्या आर्थिक जीवनाचें केन्द्र असून, गोव्यापासून नागपूरपर्यंत पसरलेल्या साऱ्या मराठी जनतेच्या आर्थिक जीवनाचें संवर्धन आणि शोषण दोन्हीहि ती आज करीत आहे. अशा या महाराष्ट्राच्या आर्थिक, औद्योगिक आणि सांपत्तिक केंद्राला महाराष्ट्रांतून बाहेर काढून 'स्वतंत्र' (Free)

ठेवणें, म्हणजे शरीराला रक्ताचा पुरवठा करणारें हृदय शरीरांतून बाहेर काढून ठेवण्यासारखेंच होय. आज मुंबई शहर हें महाराष्ट्राचा द्रव्यशोष करून त्याच्या आर्थिक आणि राजकीय जीवनावर हुकमत गाजविणाऱ्या भांडवलशाहीचा बालेकिल्ला होऊन बसलेलें आहे. हा बालेकिल्ला पडल्याशिवाय, मुंबईत तळ देऊन महाराष्ट्राचें आर्थिक जीवन शोषित आणि नियंत्रित करणाऱ्या भांडवलशाहीचा नाश होऊन हा बालेकिल्ला महाराष्ट्रांत अंतर्भूत झाल्याशिवाय महाराष्ट्राचें पुनरुत्थान आणि पुनर्घटना होणार नाहीं.

त्या पुनरुत्थानच्या दिवसाकडे माझे डोळे आज लागलेले आहेत; तें पुनरुत्थान हें माझें जीवनस्वप्न आहे. अकोल्याची सभा आटोपून मुंबईला आल्यावर, ता. ९ ऑगस्ट १९४७ रोजीं रात्रीं माझे परमस्नेही श्री. उमाकांत भेंडे यांच्याकडे, आम्ही कांहीं मित्रमंडळी गप्पा मारीत आनंदानें जेवत बसलों असतां उमाकांतांनीं मला विनोदानें म्हटलें, "अकोल्याला काय पराक्रम करून आलांत तें तर सांगा आम्हांला, गजाननराव !" तेव्हां, मी त्यांना अकोल्यास झालेल्या उपप्रान्ताच्या ठरावाची माहिती सांगून याच पद्धतीनें मुंबईचाहि प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न आमची परिषद करणार आहे, असें म्हटलें. त्याबरोबर उमाकांत एकदम गंभीर होऊन उद्गारले," मी तुम्हांला स्पष्ट सांगतों, गजाननराव ! तुमचं हें संयुक्त महाराष्ट्राचं स्वप्न कधींहि मूर्तावस्थेला येणार नाहीं आणि तुम्ही भग्नहृदय होऊन निराशेनें तळमळत मराल. आपण महाराष्ट्रीय लोक विभागलेले आहोंत आणि आपल्यांतील भेदभावांचा फायदा कशा रीतीनें घ्यावा हें आपले शत्रु जाणतात. संयुक्त महाराष्ट्राविषयींची तुमची तळमळ मी जाणतों–तुमचें तें जीवनस्वप्न आहे आणि तुम्ही त्याच्या पूर्ततेसाठीं साऱ्या गोष्टी सोडून दिलेल्या आहेत. पण, मला भीति वाटते, तें तुमचें स्वप्न एकाकी आणि व्यर्थ आहे ! तें स्वप्न कधींहि सफल होणार नाहीं;–तुमच्या डोळ्यांदेखत तर खासच नाहीं ! म्हणून माझी तुम्हांला कळकळीची विनंति आहे कीं, तुम्ही आपल्या अद्भुत शक्तींचा अपव्यय या वांझोट्या, एकांड्या कार्यासाठीं करूं नका. वाङ्मयाच्या क्षेत्रांत परत या आणि आपल्या पूर्वीच्या वैभवानें पुनश्च तळपा !"
(I tell you, Gajananrao, your dream of a United Maharashtra will never be realised and you will die a broken hearted man. We Maharashtrians are a divided people

and our enemies know how to exploit our differences. I know, what United Maharashtra means to you. It is your lifedream and you have given up every thing for its realisation. But I am afraid it's a lone and vain dream and it will never be realised, not at least in your life time. I therefore earnestly request you not to waste your wonderful energies for this lost, forlorn cause. Better return to literature and you will shine again in your pristine glory.)

उमाकांतांचे हे उद्गार ऐकून मी क्षणमात्र स्तब्ध होतों. कारण त्यांनीं बोलून दाखविलेल्या या कटु सत्याचीं माझ्या हृदयांत बोंचणारीं कंटकशल्यें डिवचलीं गेलीं होतीं. पण मी आपला मनःक्षोभ आवरून त्यांना म्हटलें, " तुम्ही म्हणतां तें मलाहि दिसतें, उमाकांत ! संयुक्त महाराष्ट्राची स्थापना झालेली पहाण्याचें भाग्य माझ्या नशिबीं नसेल तर नसो, पण हें काम सोडणें मात्र मला आतां शक्य नाहीं. हें काम जर मी आतां सोडून दिलें, तर माझ्या ज्या अद्भुत शक्तींचं तुम्ही एवढं कौतुक करतां, त्या साऱ्या शक्ति पिचून जातील !"

कारण, संयुक्त महाराष्ट्र हें आतां माझें नुसतें जीवनस्वप्नच राहिलेलें नाहीं; तर तें मूर्तिमंत जीवनच होऊन बसलें आहे.

शांतानिवास,
नागपूर
१४ मे १९४८

ग. त्र्यं. माडखोलकर

# निवेदन

माझ्या भाषणांचें हें तिसरें पुस्तक. यांतील पहिलें भाषण समयस्फूर्त आणि बाकीचीं चार कागदी आहेत.

हीं भाषणें लिहिण्याच्या, त्यांतील संदर्भ पहाण्याच्या, त्यांची मुद्रणप्रत तयार करण्याच्या, मुद्रितें तपासण्याच्या वगैरे कामीं श्री. वि. अं. गिजरे, श्री. ज. श्री. देशपाडे, श्री. के. ए. पोतदार, श्री. म. रा वैद्य, श्री. गो. द. दीक्षित, प्रो. रा. म. मराठे, श्री. म. शं. नाडकर्णी आणि कै. मो कृ. नाडकर्णी यांचें जें निरनिराळ्या प्रकारचें सहाय्य झालें, त्याचा निर्देश कृतज्ञतापूर्वक करीत आहें. मात्र, मी स्वतः मुद्रितें तपासूं न शकल्यामुळें या पुस्तकांत जर कांहीं मुद्रणदोष आढळले, तर वाचकांनीं सहृदयतेनें त्या दोषांकडे काणाडोळा करावा, अशी माझी त्यांना विनंति आहे.

हें छोटें पुस्तक मी मोहन कृष्ण नाडकर्णी याच्या प्रियतम स्मृतीला अर्पण करीत आहें. १९४० च्या नोव्हेंबरमध्यें मुंबई प्रांतिक साहित्यसंमेलनाच्या कल्याण येथील अधिवेशनाचा अध्यक्ष म्हणून मी मुंबईला आलों असतां ता. १५ नोव्हेंबर रोजीं मोहन मला भेटला. त्या वेळीं तो एल्फिन्स्टन कॉलेजमध्यें इंटरमिजिएटच्या वर्गांत होता; व उत्कृष्ट मराठी गद्य आणि लालित्यपूर्ण इंग्रजी पद्य लिहिणारा तीव्र बुद्धीचा व्यासंगी विद्यार्थी म्हणून त्यानें माझें मन आपल्याकडे वेधून घेतलें. त्यानंतर अडीच महिन्यांनीं ता ६ फेब्रुवारी १९४१ रोजीं. बडोद्याच्या वाङ्मय परिषदेहून मी मुंबईला आलों असतां मोहनचा सहाध्यायी मित्र मनोहर शंकर नाडकर्णी याच्याशीं माझी ओळख झाली. मनोहर हा तितकाच बुद्धिमान्, पण गणिताचा विद्यार्थी. त्या दोघांशीं झालेल्या या परिचयाचें पर्यवसान लवकरच गाढ साहचर्यांत झालें. दोघांनाहि मी मुलांप्रमाणें मानलें आणि मित्रांप्रमाणें वागवीत आलों. गेल्या सात वर्षांतील माझ्या हर एक उद्योगांत, मी जेव्हां जेव्हां मुंबईस असें त्या त्या वेळीं, मोहन-मनोहर हे सदैव छायेप्रमाणें माझ्याबरोबर राहून मला शक्य ती सर्व मदत तत्परतेनें करीत. एकादे वेळीं जरी मी त्यांच्याशिवाय एकटा भेटावयाला गेलों, तरी

'प्रभात'चे संपादक श्री. श्रीपादराव नवरे मला हंसून विचारावयाचे, "काय हो! तुम्ही आज एकटे कसे? जय-विजयांपैकीं कोणीच कसा तुमच्याबरोबर नाहीं!"

त्या दोघांत मोहनचा उपयोग त्याच्या विशिष्ट स्वभावगुणांमुळें मला विशेष झाला. १९४६ च्या मेमध्यें बेळगांव येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्य संमेलनाला, १९४६ च्या जुलैमध्यें मुंबई येथें भरलेल्या महाराष्ट्र एकीकरण परिषदेला आणि १९४७ च्या एप्रिलमध्यें जळगांव येथें भरलेल्या संयुक्त महाराष्ट्र परिषदेला तो माझ्या बरोबर हजर होता; व या परिषदांचें वृत्तलेखन, रॉयटर्सचा प्रतिनिधि म्हणून, त्यानें मोठ्या दक्षतेनें केलें. किंबहुना, तो मुंबईस असेपर्यंत संयुक्त महाराष्ट्र परिषदेचें प्रचार खातें, श्री. पवते यांच्या बरोबरीनें, त्यानें उत्साहानें सांभाळलें होतें. १९४७ च्या सप्टेंबरमध्यें माझ्या सूचनेनुसार रॉयटर्समधील काम सोडून तो श्री. शंकरराव देव यांच्या हाताखालीं त्यांचा खाजगी चिटणीस म्हणून राहिला. ता. २ एप्रिल १९४८ रोजीं त्याचा विवाह मुंबईस थाटानें झाला; व ता. १४ एप्रिल रोजीं तो आणि त्याची पत्नी मिरा अशीं दोघें मधुचंद्रासाठीं लोणावळ्याला गेलीं. तेथें ता. १८ रोजीं सायंकाळीं मिरासह तो तुंगारली तलावांत पोहावयाला गेला असतां, अकस्मात् पाण्यांत बुडून ऐन पंचविशीच्या उमेदींत त्याच्यावर काळाचा घाला पडला.

मोहनच्या या अपमृत्यूसंबंधींचें मनोहरचें ता. २१ एप्रिलचें पत्र ज्या वेळीं माझ्या हातीं पडलें, त्या वेळीं आपल्या जीवनांतली सगळी रुचि आणि सगळे रस सुकून गेल्यासारखे मला वाटले. आणि त्याच मनःस्थितींत मी आजहि आहे. ता. २ फेब्रुवारीपासून ता. २२ मार्चपर्यंत एकापेक्षां एक दुर्धर असे तीन प्रसंग मजवर ओढवले. पण त्या तिन्ही संकटांना पालाण घालून मी पूर्ववत् ईर्ष्येनें उभा राहूं शकलों. तथापि मोहनच्या निधनाचें दुःख मात्र मी सोसूं शकलों नाहीं. १९१९ सालच्या जूनमध्यें लेखक म्हणून सार्वजनिक आयुष्यांत प्रवेश केल्यापासून अनेक बुद्धिमान् तरुणांशीं माझा निकट संबंध येऊन त्याची परिणति गाढ स्नेहांत झाली. पण, माझ्यापासून कोणत्याहि प्रकारची अपेक्षा न करतां, आपल्या साहचर्याचा आणि सहकार्याचा फायदा मोहननें ज्या निष्ठेनें मला आमरण दिला, ती केवळ अनन्य होय. त्याची तीव्र बुद्धि, ऋजु वृत्ति आणि वत्सल निष्ठा यांनीं जसा मला पुष्कळदां निर्मल आनंद दिला, तसेंच केव्हां केव्हां कोमल दुःखहि दिलें; व त्याच्या शालीन स्वभावांतील सुसंस्कृत

विनम्रता पाहून मला नेहमीं असें वाटे कीं, पोटच्या मुलाच्या निरर्गल वात्यपणामुळें सदैव सचिंत असलेल्या आपल्या मनाला हा मानलेला मुलगा तरी विरंगुळा होऊन बसेल. पण, तो भाग्ययोग माझ्या नशिबीं नव्हता, असेंच आतां म्हटलें पाहिजे.

त्याच्या प्रेममय स्मृतीला मी हें छोटें पुस्तक आज भरल्या डोळयांनी अर्पण करीत आहे.

नागपूर
ता. १८ मे १९४८

ग. त्र्यं. माडखोलकर

# संयुक्त महाराष्ट्राच्या चळवळीची प्रगति

'संयुक्त महाराष्ट्र सभा' ता. २८ जानेवारी १९४० रोजीं मुंबई येथें प्रो. द. वा. पोतदार यांच्या अध्यक्षतेखालीं स्थापन झाली. या सभेतर्फे नागपूर विद्यापीठाचे कुलगुरु श्री तु. ज. केदार यांच्या अध्यक्षतेखालीं महाराष्ट्र एकीकरण परिषदेचें पहिलें अधिवेशन ता. २४ मे १९४० रोजीं पुणें येथें भरलें. त्यानंतर मात्र या सभेनें कांहींच हालचाल केलेली नाहीं.

तरीसुद्धां या चळवळीचें पाऊल पुढें आहे, असें मी म्हणतों.

कारण, महाराष्ट्राचे मध्यप्रांत–वऱ्हाडांतील महाविदर्भ, निजाम राज्यांतील मराठवाडा, पोर्तुगीज अंमलाखालील गोमंतक आणि मुंबई प्रांतांतील पश्चिम महाराष्ट्र असे जे चार भाग आहेत, त्यापैकीं मुंबई प्रांतांतील महाराष्ट्राच्या खालोखाल सर्वांत मोठा भाग जो महाविदर्भ, त्यांत या एकीकरणाच्या चळवळीनें चांगलेंच मूळ धरलें आहे. 'संयुक्त महाराष्ट्र सभे'च्या स्थापनेनंतर ता. १८ ऑगस्ट १९४० रोजीं वर्धा येथें डॅ. रामराव देशमुख यांच्या अध्यक्षतेखालीं महाविदर्भ परिषदेचें पहिलें आणि ता. ३ आक्टोबर १९४३ रोजीं अमरावती येथें ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर यांच्या अध्यक्षतेखालीं दुसरें अधिवेशन भरलें होतें. 'महाविदर्भ' या नांवानें जो प्रदेश संबोधिला जातो, त्या प्रदेशांत मध्यप्रांत–वऱ्हाडांतील नागपूर, वर्धा, भंडारा आणि चांदा हे नागपूर प्रांतांतील चार जिल्हे व यवतमाळ, अमरावती, बुलढाणा आणि अकोला हे वऱ्हाडांतील चार जिल्हे व नेमाड, बैतूल, छिंदवाडा आणि बालाघाट या सरहद्दीवरील चार जिल्ह्यांतील कांहीं तालुके मिळून एकंदर पाऊण कोट लोकसंख्येच्या मराठी मुलखाचा समावेश होतो. 'महाविदर्भ सभे'चे चिटणीस श्री. ए. श्री. पटवर्धन यांनीं 'महाविदर्भाची रूपरेषा' म्हणून जें एक छोटें पुस्तक प्रसिद्ध केलें आहे, त्यांत या महाविदर्भाच्या मागणीची आणि महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या प्रश्नाशीं असलेल्या तिच्या निकट संबंधाची उद्बोधक मीमांसा महाविदर्भ सभेचे एक कार्यकर्ते श्री. ह. कृ. मोहनी यांनीं केली आहे.

महाविदर्भाच्या या मागणीच्या जोडीला, ऐक्यसंवर्धनाच्या दृष्टीनें, उल्लेखनीय अशी दुसरी चळवळ म्हणजे मराठवाड्यांतील पंचावन्न लाख महाराष्ट्रीयांची राजकीय चळवळ होय. निजामराज्यांतील या मराठवाड्याची मागणी दुहेरी आहे. एक तर, मराठवाडा हा निजामराज्याचा एक स्वायत्त घटक (Autonomous unit ) बनविण्यांत यावा; व दुसरें, निजामराज्यांतील मराठी माध्यम ठेवणाऱ्या सर्व शाळा–कॉलेजांना नागपूर विद्यापीठ किंवा भावी महाराष्ट्र विद्यापीठ यांना जोडून घेण्याची परवानगी मिळावी. पहिली मागणी राजकीय, तर दुसरी सांस्कृतिक आहे. दुसऱ्या मागणीचा सरळ अर्थ असा होतो कीं, राजकीय दृष्ट्या जरी मराठवाड्याला संयुक्त महाराष्ट्रांत सामील होणें चालू घटकेला अशक्य दिसत असलें, तरी सांस्कृतिक दृष्ट्या, एका मध्यवर्ति महाराष्ट्र विद्यापीठाच्या छत्राखालीं येऊन, तो महाराष्ट्राशीं एकजीव होऊं इच्छितो. मराठवाड्याची ही मागणी अगदीं व्यवहार्य असल्यामुळे, आपल्या राज्यांतील आंध्र, कर्नाटक आणि मराठवाडा या तिन्ही घटकांना जेव्हां निजामसाहेबांना स्वायत्तता देणें भाग पडेल, तेव्हां ही मागणी सफल झाल्याशिवाय रहाणार नाहीं.

ऐक्यसंवर्धनाच्या दृष्टीनें अगदीं अलिकडे घडलेली तिसरी अनुकूल घटना म्हणजे जयकर समितीनें केलेली पुणें विद्यापीठाच्या स्थापनेची शिफारस होय. या समितीच्या प्रतिवृत्तांत बऱ्याच उणीवा आणि वैगुण्यें आहेत, याची मला जाणीव आहे. तरीसुद्धां पुणें विद्यापीठ एकदां स्थापन झाल्यावर महाराष्ट्राच्या सांस्कृतिक ऐक्याच्या परिपोषाला तें कारण होईल, याबद्दल मला शंका वाटत नाहीं; व याच दृष्टीनें अमरावतीस भरलेल्या महाविदर्भ परिषदेनें त्या प्रतिवृत्ताचें स्वागत केलें.

महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीची जी प्रगति गेल्या तीन वर्षांत झाली, तिचा हा अगदीं धांवता आढावा आहे. या प्रगतिबरोबरच ऐक्याच्या मार्गांतील कांहीं अडचणींचेंहि दिग्दर्शन करणें अवश्य आहे.

यांपैकीं पहिली मुख्य अडचण ही कीं, ' संयुक्त महाराष्ट्र सभा ' ही नामशेष झालेली असल्यामुळें, महाराष्ट्राच्या संयुक्त प्रांतघटनेची मागणी करणारी मध्यवर्ती प्रातिनिधिक जबाबदार संस्था आज महाराष्ट्रांत नाहीं. क्रिप्स वाटाघाटींच्या वेळीं आंध्र, कर्नाटक आणि महाविदर्भ यांनीं आपल्या कैफियती ब्रिटिश सरकारला सादर केल्या. पण अखिल महाराष्ट्रातर्फे मात्र त्याच्या एकसंध प्रांतघटनेची

मागणी करण्यांत आली नाहीं. कारण अशी मागणी कोण करणार ? ' संयुक्त महाराष्ट्र सभा ' ही निष्प्राण झालेली; व महाराष्ट्र साहित्यपरिषद्, बहुधा राजकारणापासून अलिप्त रहाण्याच्या कल्पनेनें, महाराष्ट्राच्या संयुक्त प्रांतघटनेची मागणी करणें, हें आपलें कर्तव्य समजत नाहीं. त्यामुळें, महाविदर्भ आणि मराटवाडा यांचे जे आपल्या स्वायत्त संघटनेसाठीं आज सदनशीर प्रयत्न चालू आहेत, ते पृथक् आणि तुटक राहिले आहेत.

दुसरी अडचण अशी कीं, गोमंतक आणि मराठवाडा हे महाराष्ट्राचे दोन भाग, ब्रिटिशेतर सत्तेखालीं असलेला सुमारें साठ लक्ष लोकसंख्येचा हा मराठी प्रदेश, महाराष्ट्र आणि महाविदर्भ यांचें एकीकरण झाल्यानंतरही, संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट करून घेण्याचा कांहीं मार्ग आज दिसत नाहीं. पुणें येथील मध्यवर्ती महाराष्ट्र विद्यापीठाच्या कक्षेत हे दोन्ही भाग यावेत, असा प्रयत्न करणें शक्य आहे. पण राजकीय ऐक्याचा मार्ग मात्र दुरापास्त दिसतो.

महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या मार्गातील याहिपेक्षां मोठी अडचण म्हणजे खुद्द सुशिक्षित राजकारणी महाराष्ट्रीय कार्यकर्त्यांची या प्रश्नासंबंधीं असलेली उदासीनता. या उदासीनतेच्या मुळाशीं जातीय आणि राजकीय मतभेद आणि अविश्वास आहे. तो कसा आणि केव्हां दूर होईल कोण जाणे.

पण तरीसुद्धां मला महाराष्ट्राचें एकीकरण हें क्रमप्राप्त व म्हणून अपरिहार्य वाटतें. कारण, कर्नाटक, महाकोशल आणि गुजरात यांना आपआपले स्वायत्त प्रांत व्हावे अशी आकांक्षा असल्यामुळें, पुढें मागें ते प्रांत मराठी प्रदेशापासून वेगळे निघाल्यानंतर, महाराष्ट्राचीं जीं विलग शकलें शिल्लक रहातील, त्यांना एकवटण्याशिवाय दुसरी काय गति आहे ? तेव्हां, महाराष्ट्राचें एकीकरण होणार, याबद्दल मला शंका नाहीं. फक्त तें घडून येणें हें आम्ही अघटितघटनापटु कालावर सोंपवावयाचें कीं स्वतःच्या कर्तृत्वानें घडवून आणावयाचें, एवढाच काय तो प्रश्न आहे !

— उषःकाल ( कोल्हापूर ), दिवाळी अंक, १९४३

*

# अनुक्रमणिका

# शुद्धिपत्र

| पृष्ठ | ओळ | अशुद्ध | शुद्ध |
|---|---|---|---|
| ११ | ९ | विधान केलें | विधान त्यानें केलें |
| १२ | २० | नसताना | नसतानाहि |
| २५ | २८ | गराठीचा | मराठीचा |
| ३० | १९ | orude | crude |
| ३३ | ११ | श्री. न. शं. पोहनेरकर | श्री न. शे. पोहनेरक |
| ४५ | २७ | तुकडे | चार तुकडे |
| ४७ | ६ | विजयानगरचे | विजयानगरम्चे |
| ४९ | २५ | आहे. | आहे, |
| ६२ | २५ | २०–२–४२ | २०–३–४२ |
| ६७ | १७ | याटली | वाटली |
| ७२ | २० | भैं | मैं |
| ७३ | १८ | बहुसंख्यजी | बहुसंख्य लोक जी |
| ८१ | ५–६ | प्रभूदेशांतून | भूप्रदेशांतून |
| ८३ | १३ | परकी | परकीय |
| ८८ | ६ | विढानांचाहि | विद्वानांचाहि |
| ८८ | १० | Reffection | Reflection |
| ९६ | ७–८ | जातींचीच जोपर्यंत | जातींचीच मुख्यतः निर्मिति आहे; व या तीन जातींत जोपर्यंत |

१ सांगली येथील विलिंग्डन कॉलेजांतील मराठी वाङ्मय मंडळाच्या वार्षिकोत्सवप्रसंगीं १९४४ च्या नोव्हेंबरमध्यें केलेलें भाषण.

सांगली, १९४४

# महाराष्ट्राचा बुद्धियोग

## प्रत्येक राष्ट्राचें आत्मीय वैशिष्ट्य—

प्रत्येक राष्ट्राचें कांहींतरी आत्मीय वैशिष्ट्य असतें व त्या वैशिष्ट्याच्या अनुषंगानेंच त्याच्या गुणावगुणांचा विकास होत जातो. इंग्लंडचें वैशिष्ट्य साम्राज्यवाद म्हणजे आक्रमणाची बुद्धि हें आहे. धर्म, व्यापार, शिक्षण, राजकारण यांपैकीं जीवनाचें कोणतेंहि क्षेत्र घ्या, त्यांत इंग्लंडची ही आक्रमणाची बुद्धि प्रभावी झालेली दृष्टीस पडते. हिंदी शिक्षणपद्धतीवर मेकॉलेनें जें टिपण लिहिलें आहे, त्यांत "हिंदुस्थानामध्यें आपल्या 'कल्पनांचें साम्राज्य' (Empire of ideas) स्थापन झालें पाहिजे व म्हणून इंग्रजी भाषेला हिंदी शिक्षणपद्धतींत प्राधान्य मिळालें पाहिजे" असें विधान केलें आहे. हें विधान करतांना 'कल्पनांचें साम्राज्य' असा जो शब्दप्रयोग त्यानें केला आहे, तो इंग्लंडच्या साम्राज्यवादी मनोवृत्तीचा निदर्शक आहे, यांत शंका नाहीं.

## महाराष्ट्र म्हणजे महन्त-राष्ट्र—

इंग्लंडचें आत्मीय वैशिष्ट्य असें साम्राज्यवाद हें आहे, तसें महाराष्ट्राचें आत्मीय वैशिष्ट्य बुद्धियोग हें आहे, असें म्हणतां येईल. महानुभावीय सूत्रपाठाच्या भाष्यकारांनीं महाराष्ट्राचें वर्णन करतांना असें म्हटलें आहे कीं, "महाराष्ट्र म्हणजे महन्त-राष्ट्र। महन्त म्हणजे थोर। जेतुला अर्थीं आपली थोरी असे। तेतुलाहि अर्थीं आणिकासी थोरी करी।" श्रीसमर्थ रामदासांच्या "महन्तें महन्त करावे। युक्तिबुद्धीनें भरावे। जाणते करोनि विखरावे। नाना

देशीं । ” या सुप्रसिद्ध ओवींत महाराष्ट्राचें हें वैशिष्ट्य पुनश्च प्रकट झालेलें आढळतें. ही जी महन्तीची कल्पना आहे, ती भगवद्गीतेंतील बुद्धियोगाच्या कल्पनेवरून सुचलेली असून, ज्ञानेश्वरापासून तों टिळकांपर्यंत गेल्या हजार वर्षांत महाराष्ट्रामध्यें निर्माण झालेल्या सगळ्या अग्रगण्य तत्त्वजिज्ञासु ग्रंथकारांनीं या बुद्धियोगाचा पुरस्कार निष्ठेनें केलेला आढळतो. भगवद्गीतेंत मोहानें ग्रस्त झालेल्या अर्जुनाला निरनिराळ्या मार्गांचा उपदेश केल्यानंतर श्रीकृष्णांनीं शेवटीं असें सांगितलें, कीं “ ऐसें सर्वज्ञेंहि मियां । सर्वही निर्धारूनियां । निकें होय तें धनंजया । सांगितलें तुज ॥ आतां तूं ययावरी । निकें हें निर्धारीं । निर्धारूनि करीं । आवडे तैसें ॥ ” याचा अर्थ असा कीं, आपल्यापरीनें अर्जुनाला योग्य तो उपदेश केल्यानंतर भगवंतानें ‘ यथेच्छसि तथा कुरु ’ असें सांगून त्याला त्याच्या इच्छेप्रमाणें निर्णय करण्याची पूर्ण मोकळीक म्हणजेच बुद्धिस्वातंत्र्य दिलें होतें. भगवद्गीतेंत ‘ बुद्धियोग ’ या शब्दानें जें बुद्धीचें स्वातंत्र्य आणि समत्व प्रतिपादन केलेलें आहे, त्याचा पुरस्कार गेलीं हजार वर्षें मराठी वाङ्मयांत निष्ठेनें केलेला दृष्टीस पडतो. या बुद्धियोगालाच आधुनिक भाषेंत बुद्धिवाद म्हणतां येईल.

## बुद्धि आणि श्रद्धा—

महाराष्ट्र बुद्धियोगी म्हणजे बुद्धि-स्वातंत्र्यवादी आहे; याचा अर्थ तो श्रद्धा-वान् नाहीं असा मात्र नव्हे. म. गांधी यांनीं गेल्या चाळीस वर्षांत अनेकदां असें म्हटलें आहे, कीं महाराष्ट्रांत श्रद्धा नाहीं. पण श्रद्धा नाहीं म्हणजे काय ? एखादी गोष्ट बुद्धीला पटत नसतांना केवळ ‘ बाबावाक्यं प्रमाणं ’ या न्यायानें तिच्यावर श्रद्धा ठेवून ती अमलांत आणणें हा श्रद्धेचा प्रकार स्वतः गांधीजींना तरी अभिमत वाटेल काय ? स्वतःच्या बुद्धीला एखादी गोष्ट पूर्णपणें पटल्यावर मग जर ती माणसानें अमलांत आणली नाहीं, तरच त्याच्यावर श्रद्धाशून्यतेचा म्हणजेच क्रियाहीनतेचा आरोप करतां येईल. कार्याकार्य किंवा इष्टानिष्ट यांचा निर्णय देणें हें बुद्धीचें कर्तव्य आहे. तें कर्तव्य बुद्धीनें चोख पार पाडल्यावर मग श्रद्धेचें कर्तव्य सुरू होतें. आधीं बुद्धि आणि नंतर श्रद्धा असाच कार्या-कार्यव्यवस्थितीचा क्रम असला पाहिजे. बुद्धीला जें पटलें तें श्रद्धेनें आचरिलें, असें माणसानें म्हणण्यांतच त्याच्या बुद्धिस्वातंत्र्याचें आणि श्रद्धाबलाचें खरोखरी

सार्थक आहे. अंधश्रद्धा ही कोणत्याहि परिस्थितींत त्याज्यच ठरेल. खिस्तानें समुद्रावर आपल्या मागोमाग चालत येण्याची आज्ञा शिष्यांना केली असतां ज्यांनीं ती अमान्य करून आपल्या गुरुविषयीं अश्रद्धा प्रकट केली, त्यांच्या बुद्धिस्वातंत्र्याचें निदान मी तरी कौतुकच करीन. सोरटी सोमनाथाच्या मंदिरावर जेव्हां गझनीच्या महंमदानें हल्ला केला, तेव्हां मंदिरांतील श्रद्धाळू पुजारी त्या हल्ल्याला प्रतिकार करण्याऐवजीं देवाला ' तूंच आतां स्वतःचें रक्षण करून घे ' असें प्रार्थिते झाले म्हणून सांगतात ! मूर्तीच्या सामर्थ्यावरील या अंधश्रद्धेचें पर्यवसान अखेर कशा रीतीनें झालें, याची साक्ष देत आज सोमनाथाचें उध्वस्त मंदिर उभें आहे. उलट शंकराचार्यांचे मठ हे अत्यंत पवित्र गणले जात असतांहि परशुरामभाऊ पटवर्धनांनीं त्या मठांवर तोफा डागावयाला प्रसंगीं कमी केलें नाहीं, ही गोष्ट प्रसिद्धच आहे. म्हणून कार्याकार्यविचार हें बुद्धीचें कर्तव्य असून श्रद्धेचा अंमल बुद्धीनें निर्णय दिल्यानंतर सुरू होतो, हें नेहमीं लक्षांत ठेवलें पाहिजे. श्रद्धा डोळस असली, तरच तिची मातब्बरी आहे.

### बुद्धियोग म्हणजेच लोकशाही—

अशा प्रकारच्या बुद्धिस्वातंत्र्याचा पुरस्कार म्हणजेच खरोखरी लोकशाहीचा पुरस्कार होय. बुद्धिवाद, स्वातंत्र्यवाद आणि लोकसत्तावाद हे परस्परानुषंगी आणि परस्परपोषक आहेत. लोकसत्ता कां हवी ? तर प्रत्येक व्यक्तीला स्वातंत्र्याचा उपभोग घेतां यावा म्हणून. स्वातंत्र्य कां हवें ? तर प्रत्येक व्यक्तीला आपल्या बुद्धीचा पूर्ण विकास करून घेतां यावा म्हणून !—असा हा बुद्धिवाद आणि लोकसत्तावाद यांचा परस्परसंबंध आहे. जिथें व्यक्तिमात्राच्या बुद्धीला स्वातंत्र्य नाहीं, तिथें देश राजकीय दृष्ट्या स्वतंत्र असूनहि लोकांना गुलामींत आणि लाचारींत आयुष्य कंठावें लागतें, हें आपण आज पाहातच आहोंत. म्हणूनच मी बुद्धियोगाला पर्यायानें लोकसत्तावादाचा पुरस्कार असें म्हणतों व महाराष्ट्र हा बुद्धियोगी असल्याबद्दल मला अत्यंत अभिमानहि वाटतो. कारण बुद्धियोगाच्या अवलंबनानेंच मानवतेचा पूर्ण विकास होईल, अशी माझी पूर्ण श्रद्धा आहे.

---

२ मराठवाडा साहित्यसंमेलनाच्या
तिसऱ्या अधिवेशनाचे अध्यक्ष
या नात्यानें केलेलें भाषण.

औरंगाबाद, २८ मे १९४५

## मित्रहो,

हैदराबाद संस्थानांतील मराठी साहित्यसंमेलनाच्या या तिसऱ्या अधिवेशनाचें अध्यक्षपद मला दिल्याबद्दल मी आपला मनःपूर्वक आभारी आहें. हे माझे आभार नेहमींप्रमाणें औपचारिक नाहींत, याची जाणीव, मला वाटतें, माझ्या-पेक्षां आपल्यालाच अधिक असली पाहिजे. कारण अध्यक्षपदावर माझी निवडणूक केल्यानंतर त्या निवडणुकीला निजाम सरकारनें घेतलेली हरकत दूर करण्यासाठीं आपण सतत सहा महिने हिमतीनें आणि चिकाटीनें जे प्रयत्न केले, ते या संमेलनाच्या इतिहासांत संस्मरणीय होऊन बसतील. या प्रयत्नांत जसा आपला मजविषयींचा अकारण लोभ तशीच नागरिक-स्वातंत्र्याविषयीं निष्ठाहि प्रकट झाली आहे. वस्तुतः, ज्या निजामराज्यांत श्रीदासगणूमहाराज, वृत्तसम्राट् यशवंतराव कोरेकल आणि कीर्तनकोविद दे. ल. महाजन, यांच्यासारखे प्रासादिक वाणीचे भक्तकवि, श्री. कान्त, श्री. मनाठकर आणि डॉ. पुरवार, यांच्यासारखे नवीन दृष्टीचे भावकवि, प्रो. चिं. नी. जोशी, प्रो. र. म. भुसारी आणि श्री. वि. अं. कानोले, यांच्यासारखे विद्वान् संशोधक व श्री. 'दिवाकर कृष्ण' केळकर, डॉ. वा. दा, गाडगीळ आणि श्री. बी. रघुनाथ, यांच्यासारखे नामांकित कथा-लेखक आहेत, त्या राज्यांतील मराठीच्या उपासकांना स्थानिक परिस्थितीशीं विशेष परिचित नसलेल्या माझ्यासारख्या 'गैरमुल्की' अध्यक्षासाठीं निजाम सरकारशीं हुजत घालण्याची काय गरज होती ? पण, नागरिकस्वातंत्र्याच्या दृष्टीनें हा प्रश्न मौलिक हक्कांचा आणि मूलभूत तत्त्वांचा होता; व म्हणून तो लोकपक्षाला अभिमानास्पद अशा रीतीनें सोडवून घेतल्याबद्दल मी आपलें स्वागतमंडळ आणि त्याचे कार्यकुशल अध्यक्ष श्री. हनुमंतराव वैष्णव यांचें अभिनंदन करितों.

## साहित्याला सरहद्दी नाहींत—

स्वागतमंडळाप्रमाणें या बाबतींत निजाम सरकारचेंहि अभिनंदन करणें अवश्य आहे. कारण, या संमेलनाचा अध्यक्ष 'गैरमुल्की' म्हणजे निजाम राज्या-बाहेरला नसावा आणि त्यांत राजकीय विषयांची चर्चा होऊं नये, असे जे दुहेरी निर्बंध घालण्यांत आले होते, ते, उशीरा का होईना, रद्द करण्याची सुबुद्धि निजाम सरकारला सुचली, हें त्याच्या हळुहळु प्रजाभिमुख होतचाललेल्या वृत्तीचें एक प्रत्यंतर आहे, असेंच मी तरी समजतों. मात्र हे निर्बंध संमेलनावर घालतांना साहित्यस्वातंत्र्याच्या मूलभूत आंतरराष्ट्रीय तत्त्वांचा निजाम सरकारला विसर पडला होता, असें स्पष्ट म्हणणें मला भाग आहे. राज्य आणि राजा यांच्या मान्यतेला जशा स्थलकालांच्या मर्यादा असतात, तशा त्या वाङ्मय आणि विद्वान् यांच्या मान्यतेला नसतात, किंबहुना नसल्याहि पाहिजेत, हें 'विद्वान् सर्वत्र पूज्यते' या सुभाषिताच्या रूपानें सर्वसंमत असलेलें तत्त्व निजाम सरकारला माहीत नसेल, असें कसें म्हणावें? 'पेन' (The P. E. N.) सारख्या सर्व जगांतलि लेखकांच्या विश्वसंघानें कोणत्याहि मानवानीर्मित कृत्रिम सरहद्दी वा निर्बंध न जुमानणारें वाङ्मयोपासनेच्या विश्वधर्माचें तें तत्त्व प्रत्यक्ष व्यवहारांत आणून दाखविल्याचें आपण आज पहातच आहोंत; व महायुद्धाच्या ऐन धुमश्चक्रींतहि भारतीय साहित्य आणि संस्कृति यांचा परिचय करून घेण्यासाठीं परदेशांतील शिष्टमंडळें हिंदुस्थानांत आलीं होतीं, हेंहि मशहूर आहे. कारण, "वाङ्मयोपासनेचा विश्वधर्म हा साहित्याला घातल्या जाणाऱ्या मर्यादांचा कायदे-शीरपणा मुळींच मान्य करीत नाहीं आणि साहित्याच्या आविष्काराला स्वातंत्र्य हें प्राणभूत आहे असें समजतो."

(The liberal brotherhood of the P. E. N. denies the legitimacy of literary frontiers and demands freedom as the breath of life of literary expression.)

अशा स्थितींत, या संमेलनाच्या अध्यक्षपदाच्या बाबतींत 'मुल्की-गैरमुल्की' पणाचा प्रश्न उपास्थित करून, स्वतःच्या सुसंस्कृतपणाच्या दिमाखाला नाट लावण्याचा जो प्रसंग निजाम सरकारनें ओढवून घेतला होता, तो संमेलनावरील

सारे अन्याय्य निर्बंध रद्द करून अखेर टाळल्याबद्दल त्यांचें कोण कौतुक करणार नाहीं ?

## मुल्की आणि गैरमुल्की—

शिवाय 'मुल्की' आणि 'गैरमुल्की' म्हणजे तरी काय ? कोणताहि मराठी लेखक, केवळ निजामराज्यांत जन्म घेण्याचें भाग्य त्याला लाभलें नाहीं, एवढ्याच एका कारणामुळें महाराष्ट्राच्या या आदिभूमींतील साहित्यसंमेलनाचा अध्यक्ष व्हावयाला अपात्र ठरविण्यांत यावा, यापरती हास्यास्पद गोष्ट ती कोणती? नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलेला मराठीचा मुलूख हा जरी आज दुर्दैवानें निरनिराळ्या राज्यसत्तांच्या अंमलाखालीं विभागला गेलेला असला, तरी तो मूलतः एकसंध, एकभाषी आणि एकात्म प्रदेश आहे, हें विसरून चालणार नाहीं; व म्हणून त्या मुलुखांत जन्मलेला महाराष्ट्रीय मनुष्य हा महाराष्ट्राच्या कोणत्याहि भागांत गेला, तरी तो 'मुल्की'च समजला गेला पाहिजे; त्याला 'गैरमुल्की' ठरवणें म्हणजे मराठीच्या मुलुखांत कुठेंहि संचार करण्याच्या त्याच्या जन्मसिद्ध हक्काला हरताळ फांसणेंच नव्हे काय ? विशेषतः निजाम सरकारच्या तोंडीं तरी ही 'मुल्की-गैरमुल्की' ची भाषा मुळींच शोभत नाहीं. "दक्षिण भारताच्या कोणत्याहि भागांत 'मुल्की' किंवा 'माद्री' नसलेली उर्दू जबान ही निजाम सरकारनें आपल्या उस्मानिया विद्यापीठाची बोधभाषा केलेली असून, या अभिनव योजनेच्या जोरावर हैदराबाद संस्थान हें हिंदुस्थानांतील इस्लामी संस्कृतीचें केंद्र करण्याचा त्यांचा पद्धतशीर प्रयत्न आज चालला आहे."

(The Hy'bad Govt. have recently made the bold experiment of establishing a University of which the official language, contrary to the custom elsewhere in India, is Urdu. The scheme is not entirely popular with non-Muslims, but it is making headway. It should help to establish Hy'bad as the cultural centre of Islam in India.)

त्याचप्रमाणें आपल्या राज्याबाहेरील 'गैरमुल्की' उर्दू आणि फारशी ग्रंथकारांना हजारों रुपयांची खैरातहि ते मुक्त हस्तानें करीत असतात उर्दू

आणि फारशी या भाषांना असलेला त्यांचा हा राजाश्रय मला एका परीनें अभिनंदनीय वाटतो. कारण त्यांत निजामसाहेबांची आपल्या पूर्वजांच्या थोर संस्कृतीविषयींची जिवंत कळकळ प्रतीत होते. पण, त्याबरोबरच मला असा प्रश्न त्यांना विचारावासा वाटतो, कीं आपल्या राज्याबाहेरील 'गैर-मुल्की' उर्दू किंवा फारशी ग्रंथकारांना उदार आश्रय देणाऱ्या त्यांच्यासारख्या दूरंदेशी सरकारनें मराठी ग्रंथकारांना आपल्या राज्यांतील मराठी मुलुखांत 'गैरमुल्की' ठरवून मराठीच्या संमेलनाचे अध्यक्ष किंवा वक्ते म्हणून यावयाला मनाई कां करावी? जी गोष्ट उर्दूच्या बाबतींत योग्य किंबहुना आवश्यक ठरते, ती मराठीच्या बाबतींत अयोग्य ठरावी, हा कुठला न्याय? आणखीहि एक गोष्ट निजाम सरकारनें लक्षांत घेणें जरूर आहे. ती ही कीं, 'मराठवाडा' या नांवानें निजामराज्यांत मोडला जाणारा मराठी प्रदेश हा महाराष्ट्राचा सलग, सजीव आणि संस्कारी भाग असून, त्या मराठवाड्याचे आणि महाराष्ट्राचे हितसंबंध एक आणि अभिन्न आहेत. मराठवाड्याचें महाराष्ट्राशीं असलेलें हें सांस्कृतिक सात्म्य ध्यानांत घेऊनच त्याच्या उन्नतीचा आणि भवितव्याचा विचार करणें हें निजाम सरकारचें कर्तव्य नाहीं काय? 'पान-इस्लाम'च्या स्वप्नसदृश जगड्व्याळ कल्पनेवर ज्यांची नितांत श्रद्धा आहे, त्या निजाम सरकारला महाराष्ट्रएकीकरणाच्या, त्या मानानें किती तरी सौम्य, स्वाभाविक आणि अत्यंत व्यवहार्य, ध्येयाला धरून केलेली ही मागणी कां मान्य होऊं नये?

## मातृभाषांची पद्धतशीर पायमल्ली—

हे निर्बंध ज्या धोरणाचे निदर्शक आहेत, त्या धोरणांतूनच खरोखरी निजामराज्यांतील भाषेचें राजकारण उपस्थित झालें आहे; व त्याचें स्वरूप इतकें उग्र आणि तीव्र आहे कीं, साहित्यसंमेलनांत राजकारणाची भाषा बोलण्याची मुळींच इच्छा नसतांनासुद्धां मला ती भाषा बोलल्याशिवाय गत्यंतर उरलेलें नाहीं. हैदराबाद संस्थानाचे (१) आंध्र, (२) मराठवाडा, आणि (३) कर्नाटक, असे तीन मुख्य घटक प्रांत किंवा सुभे असून, तेलगु भाषा बोलणारे आंध्र ऐंशी लक्ष, मराठी भाषा बोलणारे महाराष्ट्रीय चाळीस लक्ष आणि कानडी भाषा बोलणारे कन्नड बावीस लक्ष आहेत. १, ६१, ९४, ३१३

लोकसंख्येच्या या संस्थानांत उर्दू बोलणारे लोक पुरते वीस लाखहि नाहींत. तथापि, संस्थानाची राजभाषा उर्दू ही असून, सर्व शिक्षणाची बोधभाषासुद्धां उर्दू हीच आहे. १९१९ च्या ऑगस्टमध्यें उस्मानिया विद्यापीठ स्थापन झाल्यापासून तर उर्दूचा प्रसार झपाट्यानें करण्यांत येत असून, तेलगु, मराठी, आणि कन्नड या निजामराज्यांतील तीन महत्त्वाच्या लोकभाषांची त्या प्रमाणांत गळचेपी होत आहे. शिक्षणक्षेत्रांतील उर्दूचें हें आक्रमण इतकें निरर्गल आहे, कीं उर्दू ज्यांची मातृभाषा नाहीं अशा आंध्र, महाराष्ट्रीय किंवा कन्नड मुलींनाहि हायस्कूलचें शिक्षण घ्यावयाचें झाल्यास ती आवश्यक भाषा म्हणून शिकणें भाग पडतें. उर्दूच्या या आक्रमणांतून मार्ग काढण्यासाठीं खाजगी शाळा-कॉलेजें स्थापन करण्याचा प्रयत्न लोकांनीं करूं म्हटलें, तर त्यांना तीहि वाट निजाम सरकारनें मोकळी ठेवलेली नाहीं. १९४४ च्या मे मध्यें काढलेल्या एका पत्रकांत निजाम सरकारनें असें स्पष्ट म्हटलें आहे कीं, " उस्मानिया विद्यापीठ हें प्रत्यक्ष शिक्षण देणारें स्थायी विद्यापीठ असल्यामुळें तें आपल्या नियंत्रणाखालीं कॉलेजें उघडूं शकेल; पण खाजगी कॉलेजें तें जोडून घेऊं शकणार नाहीं किंवा इतर विद्यापीठांना जोडलेलें कॉलेज आपल्या प्रदेशांत कोणीं उघडल्यास सरकार तें सहन करणार नाहीं. "

( The Usmania University being of a unitary teaching and residential type, it can open branches under its control and management, but cannot affiliate private colleges nor will the Government tolerate administratively any other college being opened in the territory affiliated to any other University. )

अशा स्थितींत, उर्दू ही ज्यांची मातृभाषा नाहीं अशा हैदराबाद संस्थानांतील सुमारें दीड कोट आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक प्रजाजनांच्या शिक्षणाचा कोंडमारा व्हावा, यांत नवल काय? १९४१ च्या शिरगणतीविषयीं लिहितांना हैदराबाद संस्थानांतील खुद्द शिक्षणखात्याच्या डायरेक्टरनेंच मुळीं अशी कबुली दिली आहे, कीं संस्थानांतील शाळेंत जाण्याजोग्या चोवीस लाख मुलांपैकीं अवघीं चार लाख मुलेंच काय तीं आज शिक्षणाचा लाभ घेत आहेत! ब्रिटिश हिंदुस्थानांतील उपरें इंग्रज सरकार हें शैक्षणिक बाबतींत एरवीं कितीहि

कर्तव्यचुकार असलें, तरी खाजगी शिक्षणसंस्था काढून स्वतःच्या कल्पनेप्रमाणें शिक्षणाच्या बाबतींत प्रयोग आणि प्रचार करावयाला त्यानीं लोकांना पुष्कळच मुभा दिली आहे; व त्यामुळें समर्थ विद्यालय, टिळक महाराष्ट्र विद्यापीठ, शांतिनिकेतन, महिला विद्यापीठ किंवा आर्यसमाजाचीं गुरुकुलें, यांच्यासारख्या स्वतंत्र शिक्षणसंस्था आज आपापल्या तत्त्वानुसार शिक्षणप्रसाराचें कार्य करीत आहेत. उलट, हैंदराबादसारख्या जुन्या थोर हिंदी संस्थानांत मात्र प्रजेला शैक्षणिक बाबतींत कोणत्याहि प्रकारचें स्वातंत्र्य असूं नये, आणि तिच्या मातृभाषांची पद्धतशीर पायमल्ली करण्यांत यावी, याबद्दल कोणाला उद्वेग वाटणार नाहीं ?

## दक्षिणी संस्कृति आणि राष्ट्रीयत्व—

उर्दूचें जें हें पद्धतशीर आक्रमण हैदराबाद संस्थानांतलि अन्यभाषी बहुसंख्य प्रजेवर आज चालू आहे, त्याच्या पाठीमागें एक धोरण, एक मनोवृत्ति आणि एक तत्त्वज्ञान आहे; व तें समजावून घेतल्याशिवाय या संस्थानांतील मराठी जनता आणि मराठी भाषा यांच्या उन्नतीचा मार्ग काढणें अशक्य होईल. निजाम सरकारच्या प्रकाशनखात्यातर्फे प्रसिद्ध होणाऱ्या ' हैदराबाद समाचार ' या सरकारी मासिकाच्या गेल्या जानेवारीच्या अंकांत संस्थानांतील उर्दूप्रधान शिक्षणपद्धतीची तरफदारी करतांना असें म्हटलेलें आहे कीं, " हैदराबादेंतलि लोक वेगवेगळ्या भाषा बोलत असले, व त्यांचे पंथहि भिन्न भिन्न असले, तरी हिंदुस्थानामधील इतर भागांतील संस्कृतीपेक्षां त्यांची संस्कृति अधिक एकजिनसी व संयोगीकरणाची आहे. त्यांच्यामध्यें एका सर्वसामान्य अशा भाषेचा उदय झाला असून, तीस ' दक्षिणी उर्दू ' हें नांव देतां येईल. हि. ए. हायनेस यांच्या बहुसंख्य प्रजाजनांना ही भाषा समजते व त्यांना ती बोलतां येते. तसेंच हिंदु-मुस्लिम संस्कृति आणि उत्तर व दक्षिण हिंदुस्थानांतील संस्कृति या सर्वांचें मधुर मिश्रण दक्षिणी संस्कृतींत झालें आहे.... सर्वसामान्य दक्षिणी राष्ट्रीयत्व निर्माण व्हावें म्हणून परस्परसंमति, तडजोड, व संयोगीकरणपद्धति, या सर्वांचा महत्तम साधारण विभाजक काढून हें धोरण आंखण्यांत आलेलें आहे. निरनिराळ्या भाषा व पंथभेदातीत भूमिका स्वीकारण्याची प्रवृत्ति या दक्षिणी राष्ट्रीयत्वाच्या मुळाशीं आहे." साहित्याशीं

प्रत्यक्षतः संबंध नसलेल्या राजकीय विषयावर बोलावयाचें नाहीं, अशी मर्यादा स्वतःला घालून घेतलेली असल्यामुळेंच, खरोखरी, निजाम सरकारनें पैदा केलेल्या या 'दक्षिणी राष्ट्रीयत्वा'चे जे विदारक परिणाम, बहुसंख्य प्रजेचें राज्य-घटनेंतील स्थान आणि महत्त्व यांच्यावर झाले आहेत, त्यांसंबंधीं मी आज बोलूं इच्छीत नाहीं. पण, 'दक्षिणी राष्ट्रीयत्वा'च्या या धोरणानुसार आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक या निजामराज्यांतील तीन सुभ्यांतल्या बहुजनसमाजाला 'दक्षिणी संस्कृती'ची जी दीक्षा सध्यां जबरदस्तीनें आणि झपाट्यानें दिली जात आहे, ती पाहून मात्र फासिस्ट हुकूमशहा मुसोलिनी यानें आपल्या तावडींत सांपडलेल्या टिरोलमधील जर्मन प्रजेला दिलेल्या इटालियन संस्कृतीच्या दीक्षेचें उदाहरण आपल्या नजरेला आणून देणें मला अवश्य वाटतें. सेंट जर्मेनच्या तहानुसार २,३०,००० जर्मन वस्तीचा दक्षिण टिरोल हा ऑस्ट्रियाचा प्रांत इटलीला मिळाला. ऑस्ट्रियाचा हा प्रांत इटलीला बहाल करतांना तहपरिषदेनें अशी हमी दिली होती कीं, "या प्रांतांतील जर्मन जनतेची भाषा, संस्कृति आणि आर्थिक हितसंबंध यांचें रक्षण दक्षतेनें केलें जाईल." पण तह-परिषदेनें दिलेलें हें आश्वासन धाब्यावर बसवून दक्षिण टिरोलमधील असहाय जर्मन प्रजेला इटालियन संस्कृतीची जी दीक्षा दंडुकेशाहीच्या जोरावर देण्यांत आली, तिचें वर्णन १९२६ च्या फेब्रुवारींत पॅरिसमधील एका फ्रेंच पत्राला दिलेल्या मुलाखतींत मुसोलिनीनें केलें होतें. या मुलाखतींत त्यानें अशी फुशारकी मारली होती कीं, "पूर्वी जेव्हां मी दक्षिण टिरोलला भेट दिली, तेव्हां तेथील सर्व कांहीं जर्मन असल्याचें माझ्या आढळांत आलें. सर्वत्र अधिकारी जर्मन होते आणि सर्वत्र फक्त जर्मन भाषाच कानांवर पडत होती......पण आतां टिरोल-मधील सर्व शाळांतून इटालियन भाषेचें शिक्षण सक्तीचें झालें आहे, सर्व अधिकारी इटालियन नेमले गेले आहेत, व इटालियन कुटुम्बांची तेथें वसाहत करविण्याच्याहि बेतांत आम्ही आहोंत...अशा रीतीनें तो सर्व प्रदेश इटालियन करण्यांत आम्ही खात्रीनें यशस्वी होऊं."

(When I visited the South Tyrol, I noticed that everything there was German : church, school, public functionaries, railway and post officials. Everywhere nothing but the German language was heard.........Now

in all the schools of this province the teaching of the Italian language is obligatory, all post and railway officials are Italians and we are just now about to settle there a large number of Italian families. In this way we shall succeed in Italianising the country.)
'दक्षिणी राष्ट्रीयत्वा'च्या भपकेबाज नांवाखालीं निजामराज्यांतील आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक प्रजेचें जें उर्दूकरण आज चालू आहे, त्याला दक्षिण टिरोल-मधील जर्मन प्रजेच्या या इटलीकरणाइतका समर्पक दाखला दुसरा कोणता देतां येईल? जेतृत्वाच्या दर्पानें धुंद झालेल्या हुकूमशहांकडून आपल्या ताबडींत सांपडलेल्या जित जनसमाजांच्या भाषेची आणि संस्कृतीची जी ही पायमल्ली बुद्धिपुरस्सर केली जाते, ती लक्षांत घेऊनच जिनीवा येथें भरलेल्या जगांतील अल्पसंख्य जमातींच्या महासभेनें असा खणखणीत ठराव केला कीं, "ज्या प्रदेशांत अल्पसंख्यांची जमात ही सुसंघटित वसति करून असेल, तेथें राजभाषेचें स्थान अल्पसंख्यांकांच्या मातृभाषेला देण्यांत आलें पाहिजे."

(The Congress claims that the minority language should take the place of the official language where the minority forms a compact mass)
हें तत्त्व राष्ट्रसंघानेंहि मान्य केलेलें असून, सलग वसति असलेल्या भिन्न भाषेच्या आणि संस्कृतीच्या अल्पसंख्यांना स्थानिक स्वायत्तता (Local Autonomy) देण्यांत यावी, अशा आशयाच्या या महासभेच्या मागणीलाहि संघानें अनुकूलता दर्शविली आहे.

## उर्दू ही फक्त एक भाषा—

पण, निजामराज्यांत आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक हे समाज कांहीं अल्पसंख्य नाहींत; तर ते खरोखरी अतिसंख्य असून, त्यांची भाषा हीच त्या त्या सुभ्यांत 'मादृी' आणि 'मुल्की' जबान म्हणून राजभाषा आणि बोधभाषा मानली गेली पाहिजे. निजाम सरकारचें या बाबतींतील धोरण जरी अन्यायाचें असलें, तरी सुदैवानें खुद्द निजामसाहेबांना मात्र या परिस्थितीची पूर्ण जाणीव आहे, असें दिसतें. कारण १९४४ सालीं हैदराबाद येथें भरलेल्या

अ. भा. उर्दू परिषदेला पाठविलेल्या संदेशांत त्यांनीं असे उद्गार काढले होते कीं, " माझ्या राज्यांत अनेक भाषा बोलल्या जातात आणि माझ्या प्रजाजनां-इतक्याच त्याहि मला प्रिय आहेत. उर्दू ही त्या अनेक भाषांपैकीं फक्त एक भाषा आहे. "

( There are various languages spoken in my Dominions and I hold them as equally dear as I hold my beloved subjects Urdu is only one of those languages.) पण, आपल्या राज्यांतलि अनेक लोकभाषांपैकीं उर्दू ही फक्त एक भाषा असल्याची जी इतकी तीव्र जाणीव आला हजरतांना आहे, तिची कांहींच प्रतीति त्यांच्या सरकारच्या शैक्षणिक धोरणांत आणि उस्मानिया विद्यापीठाच्या कारभारांत येऊं नये, हें त्याच्या प्रजेचें केवढें दुर्दैव! किंवा, १९३९च्या जुलैत निजाम सरकारनें ज्या राजकीय सुधारणा जाहीर केल्या, त्यांत 'संस्थानांतील मुसलमान जातीचें महत्त्व आणि ऐतिहासिक राजकीय दर्जा' लक्षांत घेऊन हिंदु-मुसलमानांतील प्रतिनिधित्वाचें प्रमाण ५०-५० असावें अशी शिफारस ज्या-प्रमाणें केली आहे, त्याचप्रमाणें उर्दू भाषेचें संस्थानांतील 'राजकीय महत्त्व आणि दर्जा' लक्षांत घेऊन तिला राजदरबारीं आणि विद्यापीठांत लोकभाषांच्या डोक्यावर बसविण्यांत आलें आहे! पण, सरकार आणि विद्यापीठ यांनीं संगनमतानें माजविलेलें उर्दूचें हें प्रस्थ म्हणजे आला हजरतांच्या अन्यभाषी दीड कोट प्रजेवर धादांत अन्याय नव्हे काय? विशेषत:, हैदराबादप्रमाणेंच जेथें संस्थानाचा अधिपति आणि त्याची प्रजा यांची भाषा अगदीं भिन्न आहे, तेथें त्या त्या संस्थानाच्या अधिपतींनीं ज्या धोरणाचा अवलंब केला आहे, तें उदार लोकाभिमुख धोरण लक्षांत घेतल्यावर तर निजामराज्यांतील उर्दूकरणाचें हें धोरण या स्वयंनिर्णयाच्या आणि लोकशाहीच्या काळांत सर्वच दृष्टींनीं अत्यंत आक्षेपार्ह वाटतें. बडोद्याचे महाराज हे महाराष्ट्रीय असून, त्या गुजराती संस्थानाची राजभाषाहि साठ वर्षांपूर्वीं मराठीच होती. पण, आपल्या संस्थानांतील अठ्ठावीस लक्ष प्रजाजनांपैकीं फक्त छत्तीस हजार लोकच काय ते मराठी बोलणारे आहेत, ही गोष्ट लक्षांत घेऊन कै. सयाजीराव महाराज गायकवाड यांनीं गुजराती ही राजभाषा केली; व मराठीचा व्यवहार खाजगी

आणि लष्करी खात्यांपुरता मर्यादित केला. बडोद्याप्रमाणेंच ग्वाल्हेर संस्थानाचे अधिपतीहि महाराष्ट्रीय असतांनासुद्धां त्या संस्थानाची राजभाषा हिंदी हीच आहे. हीच स्थिति इंदूर संस्थानांतहि दृष्टीस पडते. हीं तिन्ही संस्थानें मराठी असल्यामुळें त्यांच्या अधिपतींनीं आपल्या मायभाषेंतील वाङ्मयाच्या उत्तेजनार्थ वेळोवेळीं नाना प्रकारची मदत केली आहे, ही गोष्ट खरी; पण, संस्थानांतील बहुसंख्य प्रजेची लोकभाषा पायाखालीं लाथाडून आपली मातृभाषा ही शिक्षणाचें माध्यम किंवा राजभाषा म्हणून प्रजेच्या डोक्यावर लादण्याचें, स्वयंनिर्णयाच्या आणि लोकशाहीच्या मूलभूत तत्त्वांना विसंगत असें बेजबाबदार कृत्य मात्र त्यांनीं केलें नाहीं. हिंदुस्थानांतील तीन प्रमुख मराठी संस्थानिकांच्या या प्रजाभिमुख धोरणाशीं निजाम सरकारच्या प्रतिगामी शैक्षणिक धोरणाची तुलना केली असतां या दोन्ही धोरणांतील विषमता मनाला किती तीव्रतेनें बोंचते! उर्दू ही हिंदुस्थानांतील एक सुप्रतिष्ठित, मान्य भाषा असली, तरी तेवढ्या एका कारणामुळें तिला एखाद्या प्रांतांतील किंवा संस्थानांतील लोकभाषेचें स्थान देणें कसें योग्य आणि न्याय्य होईल? विद्यापीठांतील सरसकट सर्वच उच्च शिक्षणासाठीं उर्दूसारख्या एका देशी भाषेच्या माध्यमाची योजना करण्याचा जो साहसी आणि स्वाभिमानी प्रयोग आला हजरतांनीं केला, तो एका परीनें अभिनंदनीय आणि अनुकरणीय आहे, यांत शंका नाहीं. पण, त्या उपक्रमामुळें तेलगु, मराठी आणि कन्नड या संस्थानांतील तीन प्रमुख लोकभाषांचा जो कोंडमारा आज होत आहे, तो क्षम्य आहे, असें कोण म्हणेल? "उर्दू ही माझ्या राज्यांतील अनेक भाषांपैकीं फक्त एक भाषा" असें जें आला हजरतांनीं म्हटलें आहे, तेंच खरोखरी समर्पक आहे; व या त्यांच्या घोषणेनुसार उर्दूला ज्या दिवशीं हैदराबादच्या राज्यकारभारांत आणि शिक्षणक्रमांत तिचें योग्य स्थान दिलें जाईल, त्या दिवशीं कोणत्याहि तक्रारीला जागा उरणार नाहीं.

**प्रादेशिक स्वायत्तता हाच उपाय—**

हैदराबाद संस्थान हें आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक या तीन भिन्नभाषी घटकांचें मिळून बनलेलें असून, शिवाय उर्दूसारखी भारतीय महत्त्वाची तिसरी भाषा येथें गेलीं तीन शतकें राजभाषा म्हणून थोड्या फार प्रमाणांत प्रचलित

आहे. अर्थात् तेलगु, मराठी, कन्नड आणि उर्दू या चार भाषा हैदराबाद संस्थानांतील प्रमुख भाषा आहेत असें गृहीत धरून त्यांच्यांतील संघर्ष टाळण्याच्या व त्याबरोबरच त्यांच्यांत समन्वय घडवून आणण्याच्या दृष्टीनें भाषाविषयक धोरणाचा विचार केला पाहिजे. आज उर्दूविरुद्ध जो तीव्र असंतोष निजामराज्यांत सर्वत्र दृष्टीस पडतो, तो या कारणामुळें कीं, राजभाषा आणि बोधभाषा या दोन्ही नात्यांनीं तिनें संस्थानांतील लोकभाषांचें एकंदर व्यवहार आणि शिक्षण यांतील स्थान हिरावून घेऊन त्यांचें अस्तित्व केवळ त्या त्या भागांतील लोकांच्या खाजगी बोलण्यांतील घरगुती भाषा एवढ्यापुरतेंच जेमतेम शिल्लक ठेवलें आहे. पण भाषा ही कांहीं केवळ बोली नाहीं; केवळ विचारांचें वाहन किंवा शिक्षणाचें माध्यमहि नाहीं; तर शतकानुशतकें वहात जाणारी आणि पिढ्यान्‌पिढ्यांचा परिपोष करणारी ती जनसमाजाची जीवनगंगा आहे. समाजाचें एकंदर सांस्कृतिक धन सदैव सांठवीत आणि वाढवीत जाणारी ती अक्षय गंगाजळी आहे.

लोकभाषांचें हें स्वरूप आणि महत्त्व लक्षांत घेऊन आपल्या राज्यांतील प्रजाजनांच्या मातृभाषांची उर्दूकरणाच्या निरर्गल धोरणामुळें सध्यां होत असलेली गळचेपी निजाम सरकार जोंपर्यंत थांबवीत नाहीं, तोंपर्यंत हैदराबाद संस्थानात चालू असलेला लोकभाषा आणि राजभाषा यांच्यांतील लढा मिटणेंहि शक्य नाहीं. तो लढा मिटविण्याचा एकच व्यवहार्य, सनदशीर उपाय मला दिसतो; व तो उपाय सोव्हिएट रशियासारख्या अग्रगण्य मित्रराष्ट्रानें अंमलांत आणलेला असल्यामुळें आणि राष्ट्रसंघासारख्या जागतिक संस्थेनें स्वीकारलेला असल्यामुळें निजाम सरकारलाहि तो मान्य करावयाला हरकत पडूं नये, असें मला वाटतें. तो उपाय असा कीं, हैदराबाद संस्थानांतील आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक या तिन्ही भिन्नभाषी घटक सुभ्यांना प्रादेशिक स्वायत्तता ( Regional Autonomy ) देणें. या तीन सुभ्यांना प्रादेशिक स्वायत्तता दिल्यानें आला हजरतांच्या मध्यवर्ती सार्वभौम अधिसत्तेला कोणत्याहि प्रकारचा बाध किंवा गौणत्व न येतां उलट सौकर्य आणि दृढताच येईल. संस्थानांतील या तीन सुभ्यांचा विस्तार, लोकसंख्या व भाषा आणि संस्कृति यांतील भेद लक्षांत घेतां त्यांना स्थानिक कारभारापुरती प्रादेशिक स्वायत्तता देऊन त्यांच्या सांस्कृतिक विकासाला पूर्ण वाव देणें व फेडरल तत्त्वावर मध्यवर्ती कारभारांत त्यांचें हार्दिक सहकार्य घडवून आणणें हाच एक

उभयपक्षीं श्रेयस्कर मार्ग दिसतो. निजामराज्यांतील धर्म, संस्कृति आणि भाषा यांचे तीव्र भेद, त्यामुळें उत्पन्न झालेली हितसंबंधांची चमत्कारिक नाजूक गुंतागुंत व त्यांतून उद्भवलेले धार्मिक, सांस्कृतिक आणि राजकीय प्रश्न सोडवावयाला प्रादेशिक स्वायत्ततेच्या प्रदानाशिवाय दुसरा उपाय मला तरी आढळत नाहीं. ( १ ) घटक मुख्यांचा सर्व व्यवहार आणि शिक्षण स्थानिक लोकभाषांतून चालविणें, ( २ ) प्रादेशिक विद्यापीठाच्या स्थापनेला शक्य तर उत्तेजन देणें, ( ३ ) उस्मानिया विद्यापीठांत उर्दू, फारशी आणि अरबी यांच्या बरोबरीनें संस्थानांतील तीन प्रमुख लोकभाषा आणि संस्कृत यांच्या अध्यापनाची सर्व व्यवस्था करणें व ( ४ ) उर्दू ही जरी मध्यवर्ती सरकारची राजभाषा रहाणार असली, तरी तिच्या माध्यमाच्या बाबतींत कोणत्याहि प्रकारची सक्ती न करतां, तिचें शिक्षण जरूर तर हायस्कूलपासून आवश्यक करणें एवढ्या चार गोष्टी जरी निजाम सरकारनें सहृदयतेनें, समंजसपणानें आणि दक्षतेनें अंमलांत आणल्या, तरी त्यांच्या भिन्नभाषी प्रजाजनांच्या उन्नतीचा मार्ग मोकळा करून दिल्याचें श्रेय त्यांना प्राप्त होऊन, राज्यांतील असंतोष पुष्कळच कमी होईल. आज खाजगी शिक्षणसंस्था काढावयाला व त्या बाहेरच्या विद्यापीठांना जोडावयाला परवानगी नसल्यामुळें संस्थानांतील हजारों मुलें शेजारच्या प्रांतांत जाऊन उच्च शिक्षण घेत आहेत. ही स्थिति निजाम सरकारसारख्या सुसंस्कृत राज्यकर्त्यांना कमीपणा आणणारी नाहीं काय ? म्हणून निजाम सरकारनें (१) उस्मानिया विद्यापीठातर्फे चालणाऱ्या शाळा-कॉलेजांतील उर्दू माध्यमाची सक्ती काढून टाकावी, (२) खाजगी शिक्षणसंस्था आणि प्रादेशिक विद्यापीठें यांच्या स्थापनेसंबंधाचे निर्बंध रद्द करावेत व ( ३ ) आपल्या राज्यांतील ज्या शिक्षणसंस्थांना बाहेरच्या विद्यापीठांशीं संलग्न होण्याची इच्छा असेल, त्यांना तशी परवानगी द्यावी. आज त्रावणकोर संस्थानांत दोन भाषांच्या माध्यमांतून, मध्यप्रांत-वऱ्हाडांत चार भाषांच्या माध्यमांतून आणि मुंबई प्रांतांत सात भाषांच्या माध्यमांतून जेथें मॅट्रिक परीक्षेपर्यंतचें सर्व शिक्षण सुलभतेनें दिलें जात आहे, तेथें एकट्या निजाम सरकारला आपल्या राज्यांतील तीन मातृभाषांच्या माध्यमांतून शिक्षण देणें अशक्य कां व्हावें ? खरोखरी, आला हजरतांना जर आपल्या आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक प्रजाजनांच्या मातृभाषा या उर्दूइतक्याच प्रिय असतील

तर त्यांनीं निदान शिक्षणक्षेत्रापुरती तरी या तिन्ही सुभ्यांना पूर्ण प्रादेशिक स्वायत्तता देऊन, उर्दूकरणाच्या सरकारी धोरणामुळें सध्यां चालू असलेला या भाषांचा कोंडमारा ताबडतोब थांबवावयाला नको काय ?

## मुद्रण-प्रकाशनावरील निर्बंध उठवा—

शैक्षणिक स्वायत्ततेप्रमाणेंच मुद्रण आणि प्रकाशन यांच्यावर आज असलेले नाना प्रकारचे निर्बंध रद्द करून प्रजेला पूर्ण मुद्रणस्वातंत्र्य देणें हेंहि निजाम सरकारचें कर्तव्य आहे. निजामराज्यांतील चाळीस लाख वस्तीच्या मराठवाड्यांत फक्त 'निजामविजय' हें एकुलतें एक मराठी साप्ताहिक कसें तरी चालू असावें, याचा अर्थ काय होतो ? 'हैदराबाद समाचार' या सरकारी प्रसिद्धि-खात्याच्या मराठी मासिकाशिवाय एकहि स्वतंत्र मराठी नियतकालिक निघूं नये किंवा चालूं नये, ही गोष्ट तरी कशाची निदर्शक आहे ? विशेषतः मुद्रण-प्रकाशनाच्या बाबतींत मराठीची तुलना जेव्हां आपण उर्दूशीं करतों, तेव्हां शिक्षणाप्रमाणें याहि क्षेत्रांत उर्दूकरण मराठीच्या अस्तित्वाला कसें मारक झालें आहे, ही गोष्ट मनाला तीव्रतेनें जाणवल्याशिवाय रहात नाहीं. मुद्रण-प्रकाशनाच्या बाबतींत जे काय सरकारी निर्बंध आज हैदराबाद संस्थानांत जारी आहेत, त्यांचा परिणाम राज्यांतील सर्व भाषांवर सारखाच होत असलेला दिसला पाहिजे कीं नाहीं ? पण वस्तुस्थिति मात्र अगदीं उलट आहे. उस्मानी राजवटीच्या म्हणजे हल्लींच्या निजामसाहेबांच्या कारकीर्दीच्या पहिल्या पंचवीस वर्षांतील उर्दूच्या प्रगतीचा आढावा घेतांना प्रो. कादरी यांनीं असें म्हटलें आहे कीं, "फक्त गेल्या पाव शतकांत हैदराबाद संस्थानांत सुमारें चार हजार उर्दू ग्रंथ लिहिले गेले." याच कालखंडांतील मराठी ग्रंथांची संख्या पुरती चार शेंकडेहि भरणार नाहीं. या पाव शतकांत उर्दू वृत्तपत्रें आणि नियतकालिकें अडुसष्ट निघत होतीं; तर मराठींत जें एक मासिक आणि दोन साप्ताहिकें या काळांत सुरू झालीं, त्यांतलें फक्त एक साप्ताहिक अद्याप जिवंत आहे. उर्दू आणि मराठी यांच्यांतील विषम स्थितीची कल्पना येण्यासाठीं गेल्या तीन वर्षांतील ॲडमिनिस्ट्रेशन रिपोर्टांतून ग्रंथप्रकाशनाचे पुढील तौलनिक आंकडे देत आहें:—

| वर्ष | उर्दू | मराठी |
|---|---|---|
| १९३८–३९ | ३९७ | १८ |
| १९३९–४० | ४८४ | २९ |
| १९४०–४१ | ४८४ | २९ |

हे तुलनात्मक आंकडे काय दर्शवितात ? मुद्रण-प्रकाशनावरील ज्या सरकारी निर्बंधांमुळें मराठी ग्रंथ, नियतकालिकें आणि वृत्तपत्रें यांचें मुद्रण आणि प्रकाशन अशक्यप्राय झालें आहे, ते निर्बंध उर्दू वाङ्मयाच्या प्रकाशन-प्रगतीला नडत नाहींत, असाच बोध या आंकड्यांतून निघत नाहीं काय ? निजामराज्यांत उर्दू माध्यमाच्या सक्तीमुळें होणारा लोकभाषांचा हा कोंडमारा, आणि मुद्रण-प्रकाशनावरील निर्बंधांमुळें होणारी लोकवाङ्मयाची ही गळचेपी पाहून आपल्या तावडींत सांपडलेल्या अल्पसंख्य जमातींची विजयी राष्ट्रांकडून जी गांजणूक होते, तिच्या एका ब्रिटिश घटनापंडितानें केलेल्या वर्णनाची मला आठवण झाली. त्यानें असें म्हटलें आहे कीं, " अल्पसंख्यांची वासलात लावण्याच्या पद्धतींत कत्तल किंवा सामुदायिक हकालपट्टी यांच्यासारख्या रानटी प्रकारापासून तों अधिक सुसंस्कृत प्रकारापर्यंत नाना तऱ्हा आहेत. या सुसंस्कृत प्रकारांत मातृभाषेच्या अनिर्बंध उपयोगाला मर्यादा घालणें हा प्रकार सर्वांत प्रिय आहे. "

( The illtreatment of minori'ies may range from the crude forms of massacre and mass expulsion to more refined methods, of which the most popular is the restriction of the free use of the mothertongue )

निजामराज्यांत आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक हे लोकसमाज अल्पसंख्य नसून खरोखरी अतिसंख्य आहेत; व त्यांच्या एकत्रित दीड कोट लोकसंख्येपुढें उर्दू भाषिकांची १५,०७,२७२ ही लोकसंख्या केवळ अत्यल्प ठरते. पण, आंध्र, महाराष्ट्र आणि कर्नाटक हे लोकसमाज जरी अतिसंख्य असले, तरी हैद्राबाद संस्थानांतील सत्ताधारी अत्यल्पसंख्य उर्दू भाषिकांच्या दृष्टीनें ते जित समाज असल्यामुळेंच खरोखरी, त्यांच्या मातृभाषा आणि वाङ्मय यांची अशी पद्धतशीर पायमल्ली उर्दू समाजाकडून होत आहे, असें म्हटल्यास तें चूक होईल काय ? वस्तुतः, आला हजरतांनीं मुद्दाम एक फर्मान काढून राजाला धर्म नसतो अशी

निस्संदिग्ध घोषणा केली असून, उर्दू ही आपल्या प्रजाजनांच्या अनेक भाषां-पैकीं फक्त एक भाषा असल्याचेंहि त्यांनीं स्पष्ट जाहीर केलें आहे. पण, निजाम-साहेबांच्या या उदार घोषणांचें यत्किंचितहि प्रतिबिंब त्यांच्या सरकारच्या राज्य-धोरणांत किंवा उस्मानिया विद्यापीठाच्या घटनेंत पडल्याचें दिसून येत नाहीं. उलट, मुस्लिम समाज आणि उर्दू भाषा यांचें राजकीय आणि ऐतिहासिक महत्त्व टिकविण्याच्या आणि वाढविण्याच्या एकमेव उद्देशाचाच पगडा निजाम सरकारच्या नोकरशाही कारभारावर पडला असल्याचा प्रत्यय सतत येत आहे. ही जेतृत्वाची भावना नष्ट होऊन आला हजरतांची समदृष्टि जोंपर्यंत हैद्राबाद संस्थानाच्या एकंदर राज्यकारभारांत प्रभावी होत नाहीं, तोंपर्यंत येथील बहु-संख्य लोकसमाज आणि लोकभाषा यांना न्याय मिळणें मला तरी अशक्य दिसतें.

## कर्तव्यबुद्धि जागृत नाहीं—

पण म्हणून कांहीं आपण निराश होऊन चालणार नाहीं. उलट, मुद्रण-प्रकाशनाचें आणि सभा–संघटनाचें जें मर्यादित स्वातंत्र्य निजाम सरकारनें दिलेलें आहे, त्याचा जास्तींत जास्त उपयोग करून लोकभाषा आणि लोक-साहित्य यांचें संवर्धन आपण दक्षतेनें केलें पाहिजे. हैद्राबाद संस्थानांतील नोकरशाही सरकार कितीहि पक्षपाती आणि प्रतिगामी असलें, तरी संस्थानाचे अधिपति या नात्यानें आला हजरतांनीं केलेल्या दोन महनीय घोषणा अगदीं निस्संदिग्ध आहेत. एक, राजाला धर्म नसतो या लोकशाही तत्त्वाचा उद्घोष करून हैद्राबाद ही केवळ ‘ मुस्लीम रियासत ’ नसल्याची कबुली त्यांनीं पर्या-यानें दिली आहे; व दुसरें, उर्दू ही आपल्या राज्यांतील अनेक भाषांपैकीं फक्त एक भाषा असल्याचें स्पष्ट करून उर्दूकरणाचें निरर्गल धोरण अन्याय्य असल्याचेंहि त्यांनीं अप्रत्यक्ष रीतीनें मान्य केलें आहे. या त्यांच्या दोन घोषणां-च्या अचल भूमिकेवर उभें राहून हैद्राबाद संस्थानांतील सर्व जातींच्या आणि धर्मांच्या प्रजाजनांचा राजकीय आणि ऐतिहासिक दर्जा समान असल्याचें तत्त्व राज्यघटनेंत आणि विद्यापिठांत अंमलांत येण्यासाठीं शक्य ते सर्व सनदशीर प्रयत्न लोकांनीं केले पाहिजेत. राजा व्यक्तिशः कितीहि सत्प्रवृत्त असला, तरी रोजचा कारभार स्वतःच्या तंत्रानें चालवूं पहाणारी नोकरशाही पुष्कळदां त्याची ती सत्प्रवृत्ति निष्प्रभ करून टाकते. पण, राजाला जशीं कांहीं कर्तव्यें असतात,

तशींच प्रजेलाहि असतात; व राजा जेव्हां कोणत्याहि कारणामुळें आपलें कर्तव्य करावयाला असमर्थ ठरतो, तेव्हां प्रजेनें स्वतःच्या कर्तव्यनिष्ठेच्या प्रभावानें त्याला कर्तव्यतत्पर केलें पाहिजे. हैद्राबाद संस्थानांतील मराठी जनतेला आपल्या या कर्तव्याची जाणीव असावी तितकी नाहीं असें जर मी म्हटलें, तर आपण माझ्या या स्पष्टोक्तीचा राग मानतां कामा नये. महाराष्ट्राचा अत्यंत सुपीक प्रदेश या संस्थानांतील मराठवाड्यांत मोडतो. औरंगाबाद सुभा हा तर आपल्या सर्व रियासतींत संपन्न; व येथील लोक सामान्यतः सुखवस्तु आणि सधन आहेत. पण, त्यांच्या या समृद्धीचा कोणता फायदा आज मराठी भाषा आणि साहित्य यांना मिळत आहे ? प्रत्येक साक्षर मनुष्याला लेखक किंवा प्रकाशक होणें शक्य नसलें, तरी वाचक होणें खात्रीनें शक्य आहे. आणि वाचक हाच खरोखरी कोणत्याहि भाषेचा स्वाभाविक प्रचारक आणि तिच्या वाङ्मयाचा पुरस्कर्ता असतो. पण, महाराष्ट्राची आदिभूमी म्हणून इतिहासांत गाजलेल्या या मराठवाड्यांत फारशीं वाचनालयें नाहींत, प्रकाशनसंस्था नाहींत किंवा साहित्यसंस्थाहि नाहींत. या परिस्थितीबद्दल निजाम सरकारचें धोरण अंशतः जबाबदार आहे असें मानलें, तरी लोकांच्या ठिकाणीं असलेला कर्तव्यबुद्धीचा अभाव हाहि कांहीं अंशीं जबाबदार आहेच कीं नाहीं ? साहित्याच्या अनिर्बंध विकासाला येथील परिस्थिति एकंदर प्रतिकूल आहे, हें कबूल. पण, येथें जें निराशेचें निष्क्रिय वातावरण दृष्टीस पडतें, त्याला आपली मनोवृत्तीहि थोडी फार जबाबदार आहे, असें म्हटल्याशिवाय मला गत्यंतर नाहीं. १९३९ च्या सप्टेंबरमध्यें युद्ध सुरू झाल्यावर आणि १९४२ च्या ऑगस्टमध्यें सर्व सार्वजनिक चळवळी दडपून टाकण्यांत आल्यावर त्या फर्मानशाहीच्या भीषण काळांतहि ब्रिटिश रियासतींतील जनतेनें ज्या धैर्यानें आणि निष्ठेनें मुद्रण, प्रकाशन, संघटन आणि आंदोलन नाना प्रकारचे आघात सोसून चालू ठेवलें, त्यापासून कांहींच बोध निजाम रियासतींतील जनतेला घेतां येणार नाहीं काय ?

**कार्यक्रमाची रूपरेषा—**

म्हणून, मुद्रण-प्रकाशन आणि सभा-संघटन यांच्यावर जे निर्बंध आज आहेत, ते लक्षांत घेऊनहि मी असें म्हणतों कीं, मराठी साहित्याच्या प्रचाराचा आणि प्रकाशनाचा राजकारणाशीं संपर्क नसलेला किमान कार्यक्रम तयार

करून तो आपण निष्ठेनें अंमलांत आणण्याचा प्रयत्न पुढील तीन वर्षांत केला पाहिजे. या कार्यक्रमात (१) मराठवाडा साहित्यपरिषदेच्या शाखा तालुकानिहाय स्थापन करणें, (२) परिषदेमार्फत एक मासिक चालविणें आणि वर्षांतून निदान चार ग्रंथ तरी प्रकाशित करणें, (३) त्या त्या वर्षांतील उत्कृष्ट ग्रंथाला पारितोषिक देण्यासाठीं स्थायी निधि उभारणें, (४) प्रत्येक गांवीं एक वाचनालय उघडणें, (५) ऐतिहासिक महत्त्वाच्या ठिकाणीं संशोधन करण्यासाठीं औरंगाबाद किंवा हैद्राबाद येथें मध्यवर्ती केंद्र निर्माण करणें व ( ६ ) महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या परीक्षा आपल्या परिषदेमार्फत घेण्यासाठीं ठिकठिकाणीं वर्ग काढण्याची व्यवस्था करणें इतक्या गोष्टी कमींत कमी असाव्यात, अशी माझी नम्र सूचना आहे. हैद्राबादच्या मराठी मंडळाचे उत्साही कार्यवाह आणि मराठीचे तेजस्वी शाहीर श्री. न. शं. पोहनेरकर यांनीं त्या मंडळामार्फत महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या परीक्षांचे वर्ग तेथें सुरू केले आहेत; व हे वर्ग मराठवाड्यांतील औरंगाबाद, नांदेड, परभणी, बीड, उस्मानाबाद आणि बिदर या सहा प्रमुख शहरीं निघाले, तरी त्यामुळें मराठीच्या पद्धतशीर व्यासंगाला आणि प्रचाराला पुष्कळच प्रोत्साहन मिळेल. या परीक्षांमुळें हैद्राबाद संस्थानांतील शिक्षणसंस्था आणि शिक्षणखातें यांचाहि फायदा होण्यासारखा आहे. तो असा कीं, संस्थानातील प्राथमिक, माध्यमिक आणि उच्च शिक्षणसंस्थांना मराठी शिक्षकांचा जो तुटवडा आज सारखा जाणवतो, तो या परीक्षा दिलेल्या पदवीधरांना जर मराठीपुरती मान्यता देऊन शिक्षणसंस्था आणि शिक्षणखातें यांनीं त्यांचा उपयोग करून घेतला, तर खात्रीनें कमी होईल. ' अंजुमन इदारे अदबियात उर्दू ' या संस्थेला सरकारी मान्यता नसूनहि तिच्या उर्दू परीक्षा जर संस्थानांत लोकप्रिय होऊं शकतात आणि तिच्या पदवधिरांना जर शिक्षणखातें सरकारी पदवीधरांच्या बरोबरीनें पगार देतें, तर महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या परीक्षा आणि पदवीधर यांना ती प्रतिष्ठा कां प्राप्त होऊं नये ? निजामराज्यांतील मराठी शिक्षणाचा सध्यां बिकट होऊन बसलेला प्रश्न सुटावयाला या परीक्षांचा प्रचार निस्संशय उपकारक होईल. मला आपल्या अडचणींची आणि गरजांची असावी तितकी कल्पना नाहीं. म्हणून मी कार्यक्रमाची फक्त रूपरेषा तेवढीच सुचविली आहे. पण, हा सौम्य, सुटसुटीत कार्यक्रम पुढल्या तीन वर्षांत जर आपण चिकाटीनें अंमलांत आणला, तर, मला वाटतें, महाराष्ट्राच्या या आदिभूमींतून लुप्त झालेलें मराठीचें सामर्थ्य वाढीला लावल्याचें श्रेय आपल्याला खात्रीनें मिळेल,

## महाराष्ट्राच्या आदिभूमीचा वारसा—

आणि, महाराष्ट्राच्या या आदिभूमीचा वारसा आपल्याकडे आलेला आहे या जाणिवेनें प्रेरित होऊन जर आपण कार्यप्रवृत्त झालांत, तर जगांतील कोणतीहि प्रतिगामी शक्ति आपल्या प्रगतीचा मार्ग फार काळ रोखून धरूं शकणार नाहीं. कारण ही जाणीव म्हणजे मराठी भाषेच्या सर्व संचित सामर्थ्याची स्फूर्ति आहे. दक्षिण भारताला दास्यमुक्त करणाऱ्या शककर्त्या शालिवाहनाचें दिग्विजयी सैन्य ज्या गोदाकाठच्या पवित्र भूमींतून प्रकट झालें, त्या भूमीच्या विसाव्या शतकांतील संतानांना आपल्या भवितव्याविषयीं निराश होण्याचें, आपण उपेक्षित किंवा अरक्षित आहोंत, असें मानून घेण्याचें काय कारण आहे? महाराष्ट्र आणि आंध्र या भरतखंडांतील सहोदर राष्ट्रांची केवळ जीवनधाराच अशी गोदावरी या भूमींतून वाहात असून, ज्ञानदेव, चक्रधर, एकनाथ, रामदास आणि गुरु गोविंदसिंह या धर्मवीरांच्या प्रभावानें तिचे परिसर पुनीत झालेले आहेत, महाराष्ट्राच्या वाङ्मयतपस्येचीं केवळ तीर्थक्षेत्रेंच नव्हत, तर त्यांचीं धनधान्याचीं निधानेंहि याच भूमींत सांठविलेलीं आहेत. महाराष्ट्र आज जो दरिद्री समजला जातो, तो वैनगंगेपासून गोदावरीपर्यंत पसरलेल्या या सर्वसमृद्ध आदिभूमीशीं त्याची ताटातूट झाल्यामुळें. या आपल्या राष्ट्रीय हानीची आंच मराठी जनतेला जाणवत नाहीं आणि तिच्याकडून आपली उपेक्षा होत आहे, असें आपण कसें समजतां? महाराष्ट्राची सध्यांची दुरवस्था हें आपली अत्यंत विषम समाजरचना आणि तिचा मूर्तिमंत कर्मविपाकच असा आपला पूर्वेतिहास यांचें स्वाभाविक पर्यवसान आहे. ही समाजरचना आमूलाग्र बदलून महाराष्ट्र ज्या दिवशीं बंधमुक्त होईल, त्या दिवशीं नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलेल्या मराठी जनतेचें एकात्म, एकीकृत सामर्थ्य आपल्याहि उन्नतीला कारण होत असल्याचा प्रत्यय आपल्याला आल्याविना राहणार नाहीं.

## लोकशाहीचा युगधर्म—

तो दिवस आतां फारसा दूर नाहीं, असें मला निश्चित वाटतें. कारण, मराठी जनतेला जरी कदाचित् बंधमुक्त आणि एकसंध होण्याची तितकी

तळमळ लागलेली नसली व त्या ध्येयाच्या सिद्धतेसाठीं करावा लागणारा सर्व प्रकारच्या क्षुद्र संकुचित हितसंबंधांचा त्याग करण्याचीहि जरी आज तिची तयारी नसली तरी जगांतील लहानांतल्या लहान राष्ट्राला आणि दुबळ्यांतल्या दुबळ्या समाजाला पुनरुत्थानाची ग्वाही देणारा लोकशाहीचा क्रांतिकारक युगधर्म तें ध्येय मूर्तावस्थेला आणून दाखविल्याशिवाय रहाणार नाहीं. आपण बंधमुक्त होणें न होणें हें आपल्या इच्छेवर किंवा उद्योगावर आतां अवलंबून राहिलेलें नाहीं. त्या युगधर्माच्या प्रभावानें तें परिवर्तन आपोआप घडून येणार आहे. कोणी कितीहि विरोध केला, तरी तें भवितव्य कांहीं टळत नाहीं. त्या लोकशाहीच्या युगधर्माचें अनन्यभावानें अनुष्ठान करणें हाच मराठी जनता आणि मराठी भाषा यांचा एकमेव तरणोपाय आहे.

---

३ बेळगांव येथें भरलेल्या तिसाव्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनांतर्गत ललित साहित्य सभेचे अध्यक्ष या नात्यानें केलेलें भाषण.

बेळगांव, १२ मे १९४६

## मित्र हो,

महाराष्ट्र शारदेच्या वार्षिकोत्सवांतील अग्रपूजेचा जो हा बहुमान यंदा आपण मला दिला आहे, त्याबद्दल प्रथम मी आपले मनःपूर्वक आभार मानतों. हे आभार औपचारिक नाहींत. न वक्ता, न विद्वान्; न साहित्यिक, न कलाभिज्ञ; अशा माझ्यासारख्या एका वृत्तव्यावसायिकाला, केवळ पांडित्याच्या आणि लालित्याच्या दृष्टीनेंच पाहिलें तर, मराठी साहित्याच्या या अग्रासनावर बसण्याचा खरोखरी काय अधिकार आहे ? कै. शि. म. परांजपे, श्री. न. चिं. केळकर आणि श्री. कृ. प्र. खाडिलकर या महाराष्ट्रांतील तिघां मूर्धाभिषिक्त पत्रकारांना हा अग्रपूजेचा मान पूर्वी मिळालेला आहे, ही गोष्ट खरी. पण, ज्याच्या सौंदर्यशाली, विष-दिग्ध, संजीवक वाणीनें महाराष्ट्राला संपूर्ण स्वातंत्र्याच्या ध्येयाचा साक्षात्कार घडविला, ते अण्णासाहेब परांजपे, ज्यांच्या लालित्यलोलुप लेखणीनें मराठी वाङ्मयाचीं सगळीं क्षेत्रें साम्राज्ञीच्या ऐश्वर्यानें समृद्ध केलीं, ते तात्यासाहेब केळकर आणि ज्यांनीं केवळ मराठी रंगभूमीवरच नव्हे तर वृत्तव्यवसायांतहि आपल्या कर्तृत्वानें 'नवा काळ' निर्माण केला ते काकासाहेब खाडिलकर !— त्या महाभागांच्या क्रांतिसंमुख, बुद्धिप्रधान परंपरेंत जरी मी गेलीं दोन तपें घालविलीं असलीं, तरी त्यांनीं मंडित केलेल्या मराठी वाङ्मयाच्या या व्यास-पीठावर बसण्याची माझी योग्यता आहे, असें मी कसें म्हणूं ? तेव्हां, आपण केलेला माझा हा सन्मान म्हणजे स्वातंत्र्याच्या लढ्याची आघाडी ईर्ष्येनें सांभाळणाऱ्या मराठी वृत्तव्यवसायाचाच सन्मान आहे असें समजून त्या व्यवसायातर्फे मी कृतज्ञतेनें त्याचा स्वीकार करितों.

## पूर्वमहाराष्ट्राचा प्रतिनिधि—

आपले आभार मानावयाला आणखीहि एक कारण आहे. तें कारण असें कीं, नागपूर, वऱ्हाड, खानदेश आणि मराठवाडा हे जे पूर्वमहाराष्ट्राचे चार उपेक्षित विभाग, त्या विभागाच्या अस्मितेची जाणीव सुप्रगत, सुसंस्कृत पश्चिम महाराष्ट्राला अखेर झाली असल्याची खूण मला मिळालेल्या या बहुमानामुळें पूर्व महाराष्ट्रांतील जनतेला एका परीनें पटणार आहे. माझें हें विधान ऐकून पुष्कळांना राग येईल, हें मी जाणून आहें. पण, मराठी साहित्याच्या ज्या या अग्रासनावर आरूढ होण्याची संधि आपण मला दिली आहे, त्या अग्रासनावरून जर महाराष्ट्रांतील उपेक्षित, दलित, मूक जनतेचें मनोगत मी प्रामाणिकपणानें प्रकट केलें नाहीं, तर, मला वाटतें, आपण मजवर टाकलेल्या या जबाबदारीला मी अपात्र असल्याचें सिद्ध होईल. म्हणून, मी जें आज माझ्या अंतःकरणाचीं कपाटें खोलून प्रांजळपणानें बोलणार आहें, तें आपण तितक्याच प्रांजळपणानें गोड करून घ्यावें, अशी माझी आपल्याला प्रार्थना आहे. मराठी साहित्याचा काय, राजकारणाचा काय किंवा उद्योगधंद्यांचा काय विचार करतांना गोदावरीच्या पलिकडे थेट नर्मदेपर्यंत महाराष्ट्र पूर्वेकडे पसरत गेलेला आहे, महाराष्ट्र संस्कृतीचा उगम आणि महाराष्ट्र भाषेचा उद्धार प्रथम याच त्याच्या आदिभूमींत झाला आहे, शातवाहन, राष्ट्रकूट, चालुक्य, यादव आणि भोसले या ज्या पांच प्रमुख राजवंशांनीं महाराष्ट्राला भारतीय इतिहासांतील त्याचें आजचें श्रेष्ठ स्थान प्राप्त करून दिलें त्या राजवंशांचा अभ्युदय गोदाकांठच्या याच पुण्यभूमींत झाला आहे व महाराष्ट्राच्या बव्हंश भौतिक संपत्तीचें भांडारहि नर्मदेपासून गोदावरीपर्यंतच्या याच पूर्वेकडील प्रदेशांत अद्याप अलक्षित अवस्थेंत आहे, याची जाणीव किती महाराष्ट्रीय नेत्यांना आहे ? ही जाणीव जर पश्चिम महाराष्ट्रांतील सुशिक्षित समाजाला असती, तर हरि महादेव पंडित, कृष्णशास्त्री घुले, केशव लक्ष्मण दप्तरी, यशवंत खुशाल देशपांडे आणि वासुदेव विष्णु मिराशी यांना मराठी साहित्याच्या वार्षिकोत्सवांतील हा अग्रपूजेचा मान मिळाला नसता काय ? पण, गेल्या तीस वर्षांत महाराष्ट्र साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद जरी विदर्भाच्या वाट्याला तीन वेळां आलें असलें, तरी नागपूर, खानदेश आणि मराठवाडा यांना मात्र तो मान एकदांहि मिळालेला नाहीं. म्हणून

नर्मदेपासून गोदावरीपर्यंत पसरलेल्या पूर्व महाराष्ट्राचा एक अभिमानी निष्ठावंत सेवक या नात्यानेंहि आपण दिलेल्या या बहुमानाबद्दल मी कृतज्ञता व्यक्त करितों. विशेषतः, बेळगांवसारख्या महाराष्ट्राच्या दक्षिण सीमेवरील शहरानें तो मान अभावितपणें माझ्यासारख्या नागपूरच्या लेखकाला दिल्यामुळें तर त्याला विशेषच महत्त्व आणि माधुरी आली आहे.

**दक्षिण भारतापुढील कार्य—**

महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या सीमारेषेवरील या मराठी शहरांत उभें राहून बोलतांना येथें धुमसत असलेल्या मराठी–कानडी वादाची आठवण होणें अपरिहार्य आहे. पण या वादाबद्दल मला उद्वेग किंवा भीति हीं दोन्हींहि वाटत नाहींत. कारण, महाराष्ट्र आणि कर्नाटक हीं कृष्णाकांठचीं दोन सहोदर राष्ट्रें असून, गेल्या हजार वर्षांत त्यांच्या सरहद्दी सतत बदलत आलेल्या आहेत, हें मी जाणून आहें. तेव्हां या प्रश्नाबद्दल केवळ भाषेच्या अभिमानानें आपसांत भांडत न बसतां, हिंदुस्थानांतील प्रांतांची भाषावार पुनर्घटना होण्याचा सुयोग येतांच, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या प्रतिनिधींची संयुक्त समिती नेमून हा प्रश्न आपण गुण्यागोविंदानें सोडविणेंच समंजसपणाचें होणार नाहीं काय? सरहद्दीचा जो हा प्रश्न आपसांत सहविचारानें सोडवितां येण्यासारखा आहे, त्या प्रश्नावर वाद घालण्यापेक्षां, दक्षिण भारताच्या राजकीय भवितव्याच्या व्यापक दृष्टीनें जर महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्या सहकार्याचा विचार आपण केला, तर, मला वाटतें, तें अधिक इष्ट, अधिक श्रेयस्कर होईल. गुजराथ, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र आणि तामिळ हीं दक्षिण भारतांतील पांच मुख्य द्राविड राष्ट्रें आहेत; व त्यांच्या एकोप्यावरच दक्षिण भारताचें स्वातंत्र्य आणि उत्कर्ष हीं दोन्ही अवलंबून रहातील. उत्तर भारतावर ज्या ज्या वेळीं परकीयांचीं आक्रमणें आलीं आणि भारतीय संस्कृतीचा उच्छेद होण्याचा प्रसंग जेव्हां जेव्हां ओढवला, तेव्हां तेव्हां या पांच द्राविड राष्ट्रांनीं त्या परचक्रांना मोठ्या धैर्यानें तोंड दिलें; व भारतीय तत्त्वज्ञान आणि संस्कृति हीं त्यांच्या मूळच्या अविकृत शुद्ध स्वरूपांत कायम ठेवण्याचा प्रयत्न केला. पैठण, देवगिरी, अनहिलवाडा, द्वारसमुद्र, विजयानगर, म्हैसूर, बंगळूर, तंजावर, पुणें

आणि नागपूर हीं दक्षिणापथाच्या इतिहासांत तळपणाऱ्या शहरांचीं नांवें या द्राविड राष्ट्रांनीं भारतीय स्वातंत्र्य आणि संस्कृति यांच्या रक्षणार्थ केलेल्या भगीरथ प्रयत्नांची साक्ष देतात. देवगिरीच्या साम्राज्याच्या उज्ज्वल अवशेषांतून विजयानगरच्या साम्राज्याचा उदय झाला आणि विजयानगरच्या साम्राज्याच्या वैभवशाली स्मृतींतून मराठशाहीचें उत्थान झालें. देवगिरीपासून द्वारसमुद्रापर्यंतचा दक्षिणापथ म्हणजे भारतीय संस्कृतीचें परित्राण आणि पुनरुज्जीवन करण्यासाठीं दाक्षिणात्य वीरांनीं, कवींनीं आणि संतांनीं शतकानुशतकें केलेल्या पराक्रमाचा आणि प्राणार्पणाचा मूर्तिमंत इतिहासच होय. राष्ट्रसभेच्या धोरणानुसार उत्तर भारताची जर हिंदु, मुसलमान आणि शीख यांच्यांत वाटणी झाली, तर भारतीय संस्कृतीचें एकसंध, बलिष्ठ असें केंद्र दक्षिण भारतांतच निर्माण होईल, कदाचित् हेतुपूर्वक निर्माण करावें लागेल. त्या दृष्टीनें, त्रावणकोर संस्थानाचे प्रतिभाशाली प्रधानमंत्री सर रामस्वामी अय्यर यांचा 'दक्षिणापथ संसद्' स्थापन करून विंध्याद्रीपासून हिंदी महासागरापर्यंत पसरलेल्या द्राविड राष्ट्रांचें सांस्कृतिक संघटन, साहित्याच्या परस्परप्रदानानें, करण्याचा जो संकल्प आहे, तो मला स्वागतार्ह वाटतो. उत्तर भारताच्या राजकीय पुनर्घटनेंत जीं फाटाफुटीचीं विषबीजें आज दृग्गोचर होत आहेत, त्यांचे संभाव्य दुष्परिणाम लक्षांत घेतां, गुजरात, महाराष्ट्र, कर्नाटक, आंध्र आणि तमिळ या द्राविड राष्ट्रांनीं आपल्या भवितव्याचा विचार एकदिलानें करावयाला नको काय ?

## महाराष्ट्र आणि कर्नाटक—

त्यांतून महाराष्ट्र आणि कर्नाटक हीं तर सह्याद्रीच्या उत्संगावरील स्वातंत्र्याच्या वातावरणांत वाढलेलीं आणि कृष्णेच्या पुण्योदकावर परिपुष्ट झालेलीं जुळीं राष्ट्रें आहेत. त्यांची भाषा भिन्न असली, तरी संस्कृति एक आहे, उपास्य एक आहे, परंपरा एक आहे आणि इतिहासहि एक आहे. संसारांत आणि समरांगणांत त्यांचें रक्त मिसळलेलें आहे; प्रीतीच्या उद्रेकांत आणि भक्तीच्या आर्ततेंत त्यांचे अश्रु एकवटलेले आहेत. कृष्णा ही त्यांची जीवनधारा आहे आणि विठ्ठल हा त्यांच्या जीवींचा जिव्हाळा आहे. नामदेवरायांनीं म्हटलेंच आहे—

**कानडा विठ्ठल वो। उभा भीवरेतीरीं**
**भक्तांचें आर्त वो। जीवा लागलें भारी**

यादव आणि भोसले या दाक्षिणात्य राजवंशांनीं हा महाराष्ट्र आणि तो कर्नाटक असा भेद कधीं केला नाहीं. किंबहुना, महाराष्ट्राच्या स्वराज्यस्थापनेच्या प्रयत्नाचें मूळ प्रथम कर्नाटकांत रुजलें आणि नंतर त्याचा प्रसार कावेरीपासून तापीपर्यंत झाला. इतकेंच नव्हे, तर औरंगजेबानें मराठ्यांवर स्वारी केल्यानंतर जेव्हां महाराष्ट्राचा उच्छेद होण्याचा प्रसंग आला, तेव्हां छत्रपति राजाराम यानें कर्नाटकाचा आश्रय घेतला आणि कर्नाटकानें महाराष्ट्राची पाठ त्या वेळीं निष्ठेनें राखल्यामुळेंच खरोखरी मराठशाहीला एक शतकाचें तरी आयुर्मान लाभलें. कर्नाटकाचें हें ऋण महाराष्ट्र कसा विसरेल? ब्राह्मणापासून महारापर्यंत आणि हिंदूपासून मुसलमानापर्यंत सर्व जातींना आणि धर्मांना समदृष्टीनें लेखणाऱ्या श्रीविठ्ठलाच्या उपासनेचा देवगिरीपासून विजयानगरपर्यंत पसरलेला बडिवार महाराष्ट्र कसा विसरेल? दक्षिण भारताला दास्यमुक्त करण्याच्या ईर्ष्येनें उद्युक्त झालेल्या छत्रपतींच्या घराण्याच्या शाखोपशाखांचा गोदावरीपासून तुंगभद्रेपर्यंत झालेला वैभवशाली विस्तार महाराष्ट्र कसा विसरेल? धर्म, संस्कृति, इतिहास, वाङ्मय, संगीत आणि व्यापार यांपैकीं महाराष्ट्राच्या जीवनाची कोणतीहि कला घ्या, ती कर्नाटकाच्या वैशिष्ट्यानें संस्कारित आणि समृद्ध झालेली आढळेल. महाराष्ट्र आणि कर्नाटक यांचा हा पुरातन ऋणानुबंध लक्षांत घेतला व त्याबरोबरच त्यांच्या राजकीय भवितव्याचीहि एकता ध्यानांत घेतली, म्हणजे मला या दोन्ही राष्ट्रकांतील सुशिक्षितांना असें विचारावेंसें वाटतें कीं, सरहद्दीचा जो प्रश्न वाटाघाटीनें आणि तडजोडीनें सुटण्यासारखा आहे, त्यावर वाद माजवून तुम्ही या दोन राष्ट्रकांत शतकानुशतकें चालत आलेल्या सौहार्दावर आणि सहकार्यावर बिब्बा कां घालतां?

## दोघांपुढील एकच एक प्रश्न—

कारण, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांच्यापुढें आज जो एकच एक प्रश्न त्यांच्या भवितव्याचा निर्णायक म्हणून उभा ठाकलेला आहे, तो सोडवून घेण्याच्या बाबतींत त्यांना परस्परांचें सहकार्य घेणें अवश्य आहे. असें मिटान

मला तरी वाटतें. महाराष्ट्र हा ब्रिटिश, निजाम आणि पोर्तुगीज या तीन भिन्न राज्यसत्तांखालीं, तर कर्नाटक हा ब्रिटिश आणि निजाम या दोन भिन्न राज्यसत्तांखालीं विभागला गेलेला आहे; व या विभागणीमुळें या दोन राष्ट्रांचीं अनेक शकलें पडलेलीं असून, तीं एकसंध आणि एकजीव करून भावी हिंदी संयुक्त घटनेंत आपलें स्थान, भारतीय राष्ट्रसंघाचे अविभाज्य घटक म्हणून, निश्चित करून घेणें हा एकच एक प्रश्न आज या दोन राष्ट्रकांपुढें उभा आहे. मुंबई प्रांतांत काय किंवा निजामराज्यांत काय, महाराष्ट्र आणि कर्नाटक यांची परिस्थिति आज सारखीच आहे. तेव्हां, त्या दुर्धर परिस्थितींतून बाहेर निघण्यासाठीं जे काय प्रयत्न करावयाचे, ते या दोन्ही राष्ट्रकांनीं एकदिलानें केल्यास ते अधिक प्रभावी, अधिक परिणामकारक होणार नाहींत काय? किंबहुना, महाराष्ट्र हा एका काळीं कर्नाटकाच्या मानानें भारतीय राजकारणांत अग्रेसर म्हणून जागलेला असला, तरी आपली सध्यांची विच्छिन्न अवस्था लक्षांत घेऊन आपलें राष्ट्रीय ऐक्य आणि सुदृढता यांच्यासाठीं पद्धतशीर चळवळ जर कोणी आज निकरानें चालविली असेल, तर ती कर्नाटकानेंच होय. आपल्या राष्ट्रीय ऐक्यासाठीं कर्नाटक ज्या ईर्ष्येनें आज झटत आणि झगडत आहे, ब्रिटिश सरकार आणि राष्ट्रसभा या दोहींनाहि कर्नाटकानें ज्या निर्धारानें आपली राष्ट्रीय ऐक्याची मागणी सादर केली आहे, ती ईर्ष्या आणि तो निर्धार महाराष्ट्रांत कुठें आहे ? कर्नाटकानें स्वतंत्र प्रांतघटनेची आपली मागणी मुंबई कायदेमंडळाकडून मंजूर करवून घेतली; राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीचेंहि शिक्कामोर्तब तिच्यावर करवून घेतलें; व तमाम कन्नड जनता त्या मागणीच्या मागें एकमुखानें उभी असल्याचा प्रत्यय आपल्या प्रखर आंदोलनानें ब्रिटिश सरकार आणि राष्ट्रसभा यांना पुनःपुन्हा आणून दिला. त्यामुळें, ब्रिटिश सत्तेखालील कर्नाटकाच्या स्वतंत्र प्रांतघटनेचा प्रश्न जरी अद्याप सुटलेला नसला, तरी राष्ट्रसभेच्या कारभारापुरता त्याचा एकसंध, स्वतंत्र प्रांत आस्तित्वांत आला आहे, ही गोष्टहि कांहीं कमी महत्त्वाची नाहीं. त्या मानानें आपलें राष्ट्रीय ऐक्य आणि स्वतंत्र प्रांतघटना यांच्याबद्दल महाराष्ट्रांत किती उदासीनता आहे ? संयुक्त कर्नाटक सभेसारखी महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं अव्याहत चळवळ करणारी एक तरी प्रातिनिधिक, जागरूक संस्था महाराष्ट्रांत आहे काय ? किंवा कर्नाटकाच्या एकीकरणासाठीं निष्ठेनें झटत असलेले गांधी सेवासंघाचे सदस्य श्री. दिवाकर यांच्यासारखा

महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं झटणारा एक तरी नेता महाराष्ट्रांत आहे काय ? खरोखरीं, स्वतःच्या राष्ट्रीय ऐक्यासाठीं कशा रीतीनें प्रयत्न करावेत, याचा धडाच जणुं कर्नाटकानें आपल्या गेल्या वीस वर्षांतील यशस्वी आंदोलनाच्या रूपानें महाराष्ट्राला घालून दिला आहे, असें म्हटल्यास तें चूक होणार नाहीं.

## महाराष्ट्रीय नेत्यांची अनास्था —

कारण, राष्ट्रसभेच्या कारभारापुरता तरी नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पूर्वपश्चिम पसरलेल्या अखिल महाराष्ट्राचा संपूर्ण संयुक्त प्रांत निर्माण करण्याची व्यवहार्य सुलभ कल्पनाहि महाराष्ट्रांत जोर धरूं शकत नाहीं, असा माझा गेल्या दहा वर्षांचा अनुभव आहे. मग मुंबई आणि मध्यप्रांत–वऱ्हाड यांत विभागलेल्या महाराष्ट्राच्या घटनात्मक एकीकरणाची गोष्ट तर दूरच राहिली ! मराठशाहीच्या नाशाची मीमांसा करतांना कै. वासुदेवशास्त्री खरे यांनीं मध्यवर्ती सत्तेपासून फुटून निघून स्वतःचा सवता सुभा थाटण्याची महाराष्ट्रांतील कर्त्या पुरुषांची प्रवृत्ति हें मराठ्यांच्या अधःपाताचें एक मुख्य कारण म्हणून सांगितलें होतें. ती फुटीर प्रवृत्ति आजहि महाराष्ट्रीय नेत्यांत कायम आहे, असें मी म्हटलें, तर त्याबद्दल आपण राग मानूं नका. १९२० च्या आक्टोबरमध्यें राष्ट्रसभेची नवी घटना ज्या वेळीं तयार करण्यांत आली, त्या वेळीं भाषावार प्रांतरचनेच्या सर्वसंमत तत्त्वानुसार महाकोसल, गुजराथ, कर्नाटक, आंध्र, ओरिसा वगैरे अनेक नवीन प्रांत अस्तित्वांत आले; व ब्रिटिश सत्तेखालीं मुंबई आणि मध्यप्रांत वऱ्हाड या दोन प्रांतांत विभागल्या गेलेल्या महाराष्ट्राचा संयुक्त प्रांत निर्माण करण्याचा आग्रह जर महाराष्ट्राच्या या दोन भागांतील तत्कालीन पुढाऱ्यांनीं एकमुखानें धरला असता, तर निदान राष्ट्रसभेच्या कार्यापुरता तरी संयुक्त महाराष्ट्र त्या वेळीं मूर्तावस्थेला आल्याशिवाय रहाता ना. पण श्री. न. चिं. केळकर हे स्वतः राष्ट्रसभेच्या त्या घटनासमितींत असूनहि ही साधी गोष्ट होऊं शकली नाहीं. उलट, राष्ट्रसभेच्या कारभारांत महाराष्ट्राचे ( १ ) मुंबई शहर, ( २ ) मुंबई प्रांतांतील दहा जिल्ह्यांचा पश्चिम महाराष्ट्र, ( ३ ) चार जिल्ह्यांचा वऱ्हाड आणि ( ४ ) चार जिल्ह्यांचा नागपूर असे त्याचे तुकडे पडून, महाराष्ट्राच्या पूर्वीच्या राजकीय विच्छेदनांत ही आणखी नवी भर पडली. आजहि नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलेल्या अखिल महाराष्ट्राच्या

एकीकरणाच्या विचारापेक्षां नागपूरचा म्हणा, वऱ्हाडचा म्हणा किंवा मुंबई प्रांतांतील दहा मराठी जिल्ह्यांचा म्हणा, सवता सुभा कसा कायम ठेवतां येईल, हाच विचार महाराष्ट्रीय नेत्यांच्या मनांत प्रबळ असल्याचें दिसून येतें. म्हणूनच मी म्हणतों कीं, मध्यवर्ती सत्तेपासून फुटून निघून स्वतःचा सवता सुभा थाटण्याची जी फुटीर प्रवृत्ति मराठेशाहींतील कर्त्या पुरुषांत होती आणि ज्या प्रवृत्तीमुळेंच खरोखरी महाराष्ट्राचें स्वातंत्र्य अखेर नष्ट झालें, ती आत्मघातकी प्रवृत्ति आजहि महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील पुढाऱ्यांमध्यें तितक्याच प्रमाणांत प्रबळ असल्याचें प्रत्ययाला येतें. मी हें विधान पूर्ण जाणिवेनें आणि जबाबदारीनें करीत आहें; गेल्या दहा वर्षांत मला आलेल्या अनुभवांच्या आधारानें करीत आहें. वस्तुतः मुंबई शहर, पश्चिम महाराष्ट्र, वऱ्हाड आणि नागपूर या अखिल महाराष्ट्राच्या ब्रिटिश अंमलाखालील चार सलग भागांतील राष्ट्रसभेच्या प्रांतिक समित्यांनीं जर संपूर्ण महाराष्ट्राचा एक संयुक्त प्रांत उत्पन्न करण्याची मागणी राष्ट्रसभेकडे केली, तर ती मान्य करण्यांत येणार नाहीं, असें म्हणावयाला काय पुरावा आहे ? पण अशा तऱ्हेची मागणी करावयाला अवश्य असलेली एकीकरणाची तळमळ महाराष्ट्राच्या राष्ट्रनेत्यांत कोठें आहे ? श्री. शंकरराव देव, श्री. काकासाहेब गाडगीळ आणि श्री. बाळासाहेब खेर या महाराष्ट्राच्या राष्ट्रसभेंतील नेत्यांना त्यांच्या एकीकरणाची मागणी एकमुखानें करण्याइतकें या प्रश्नाचें अगत्य कोठें वाटतें आहे ? राष्ट्रसभेच्या कारभारांत महाराष्ट्राचे चार तुकडे पडल्यामुळें राजकीय संघटनेच्या आणि नेतृत्वाच्या दृष्टीनें त्याचें जें विलक्षण नुकसान झालें आहे, त्याच्या प्रत्येक राष्ट्रीय उपक्रमाला जी संकुचितता आणि विकलता आली आहे, तिची चाड आणि चीड या नेत्यांना कोठें आहे ? त्या हानीची प्रतीति जर या नेत्यांना असती, तर त्यांनीं महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न, डॉ. पट्टाभिसीताराम अय्या आणि श्री. दिवाकर यांच्याप्रमाणें, तळमळीनें हातीं घेतला नसता काय ?

## 'मैं धर्मसंकट में हूं'—

म्हणून, मी आग्रहपूर्वक असें म्हणतों कीं, राष्ट्रसभेच्या कारभारापुरतादेखील मुंबई आणि मध्यप्रांत–वऱ्हाड या दोन प्रांतांत विभागलेल्या ब्रिटिश सत्तेखालील महाराष्ट्राचा जो सलग संयुक्त प्रांत निर्माण होऊं शकला नाहीं

त्याला राष्ट्रसभेतील महाराष्ट्राच्या जुन्या आणि नव्या नेत्यांची अनास्थाच खरोखरी जबाबदार आहे. महाराष्ट्राच्या एकीकरणाची मागणी या दोन्ही भागांतील राष्ट्रसभेच्या प्रांतिक समित्यांनीं आणि कायदेमंडळाच्या राष्ट्रीय सदस्यांनीं जर एकमुखानें केली तर संयुक्त महाराष्ट्र उद्यां अस्तित्वांत येईल. ता. २९ मार्च १९४२ च्या 'हरिजना' च्या अंकांत म. गांधी यांनीं, आंध्र महासभेचे नेते विजयानगरचे महाराजकुमार यांनीं विचारलेल्या शंकेला उत्तर देतांना आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेच्या मागणीला आपला पूर्ण पाठिंबा आहे, असें जाहीर केलें. तेव्हां, ता. ७ एप्रिल रोजीं त्यांना पत्र पाठवून, महाराष्ट्राच्या स्वतंत्र प्रांतघटनेच्या मागणीचा आपण सक्रिय पुरस्कार करावा, अशी प्रार्थना मी केली. या माझ्या प्रार्थनेला ता. १९ एप्रिलच्या 'हरिजना'-च्या अंकांतून महात्माजींनीं असें उत्तर दिलें कीं,—

"एकीकरणाची मागणी त्या त्या विभागांतलि काँग्रेसवाल्यांकडून व्हावयास पाहिजे. ती मागणी जर एकमतानें करण्यांत आली, तर काँग्रेसला ती अमान्य करतां येणार नाहीं. ही गोष्ट अगदीं त्या त्या विभागांतील काँग्रेसवाल्यांच्या हातची आहे."

त्यानंतर ता. २४ एप्रिल रोजीं मी त्यांना पुन्हां पत्र घालून महाराष्ट्र एकीकरणाच्या मागणीला कांहीं प्रमुख काँग्रेस कार्यकर्त्यांकडून होत असलेला विरोध त्यांच्या निदर्शनाला आणून दिला; व त्यांना पुनश्च अशी विनंति केली कीं :—

"(१) भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व काँग्रेसला मान्य असल्यामुळें महाराष्ट्राच्या एकीकरणाची महाराष्ट्रीयांची मागणी आणि चळवळ न्याय्य आणि निरपवाद आहे असें आपण काँग्रेसवाल्यांना अनुलक्षून जाहीर करावें. (२) महाराष्ट्र, मुंबई शहर, वऱ्हाड आणि नागपूर या महाराष्ट्राच्या चार भागांतलि प्रांतिक काँग्रेस कमिट्यांनीं महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं सनदशीर प्रयत्न करण्याची इष्टता आपण सूचित करावी. (३) महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीचा एक भाग म्हणून महाविदर्भाचा स्वतंत्र प्रांत करण्याची जी मागणी वऱ्हाड–मध्यप्रांतांतील असेंब्ली आणि काँग्रेस मंत्रिमंडळ यांनीं मंजूर केली आहे तिला, आंध्र प्रांताच्या कायदेशीर मागणीप्रमाणेंच, आपण पाठिंबा द्यावा. (४) भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाला आपण आपल्या रचनात्मक कार्यक्रमांत स्थान द्यावें. (५) महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीचें आपण प्रत्यक्ष

नेतृत्व घ्यावें अशी मुळींच अपेक्षा नाहीं. फक्त त्या चळवळीला चुकीच्या कल्पनांनीं होणाऱ्या विरोधाचा परिहार करण्यासाठीं तिला पाठिंबा देऊन आपण मार्गदर्शन करावें एवढाच फक्त आग्रह आहे.

"या पांच मुद्यांसंबंधीं आपण जर जाहीर रीतीनें आपला स्पष्ट अभिप्राय प्रकट केला, तर कॉंग्रेस पक्षांत आज महाराष्ट्र आणि महाविदर्भ यांच्या एकीकरणाच्या आणि स्वतंत्र प्रांतघटनेच्या प्रश्नासंबंधीं जो विरोध दृष्टीस पडतो तो नाहींसा होईल; व आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेच्या प्रश्नाप्रमाणेंच महाराष्ट्राच्या स्वतंत्र प्रांतघटनेचा प्रश्नही, आपण आपल्या लेखांत उल्लेखिलेली नवीन व्यवस्था अंमलांत येण्याच्या सुमारास, व्यवहार्य राजकारणाच्या कक्षेंत येऊन बसेल. मला आशा आहे कीं, महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीला कॉंग्रेसवाल्यांकडून होत असलेला अन्याय्य विरोध दूर करण्याचें आणि आंध्र देशाप्रमाणें त्याला स्वायत्ततेच्या मार्गाला लावण्याचें श्रेय घेऊन आपण माझी प्रार्थना सफळ कराल."

पण, १९४२ च्या आगामी आंदोलनाचे वेध मनाला लागलेले असल्यामुळेंच बहुधा त्या व्यग्रतेच्या भरांत महात्माजींनीं ता. २९ जून रोजीं मला खाजगी रीतीनें असें लिहिलें कीं :—

"आपका खत मेरे सामने पडा है. अब इंग्रेजी मिला. बात यह है कि मैं धर्मसंकट मे हूं. महाराष्ट्र के सब विभाग एक प्रांत बने. उसमे मेरी पूर्ण संमति है. लेकिन, इस समय इस आंदोलन उठानेमे मुझे शंका है. जब सब चीज खतरेमे है तब यह एक प्रश्नका अलग महत्त्व देनें मे कहांतक औचित्य है मैं नही जानता हूं. अगर अंतमे हिंदुस्थान आझाद बनेगा तो ऐसे सब प्रश्न अपनेआप हल हो जायेंगे. ऐसी मेरी मानसिक स्थिति मे मैं कहांतक मदद दे सकता हूं ?"

१९४२ च्या मे महिन्यांत गांधीजी ज्या या 'धर्मसंकटां'त सांपडलेले होते, त्याचा आतां पूर्ण निरास झालेला असून, हिंदी राजकीय क्षितिजावर स्वातंत्र्याची उषःप्रभा फांकली असल्याचा साक्षात्कार त्यांच्या प्रज्ञाचक्षूंना सध्यां प्रत्यहीं होत आहे. म्हणून, मराठी साहित्याच्या या अग्रासनावरून मी त्यांना अशी प्रार्थना करितों कीं, आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेच्या मागणीचा सक्रिय पुरस्कार करून तिला ज्याप्रमाणें राष्ट्रसभेची संमति त्यांनीं मिळवून दिली,

त्याप्रमाणें महाराष्ट्राचीहि स्वतंत्र प्रांतघटनेची मागणी त्यांनीं राष्ट्रसभेकडून मंजूर करवून घ्यावी. ही जी प्रार्थना मी त्यांना करीत आहें, ती केवळ ते अखिल भारताचे विश्ववंद्य नेते आहेत या कारणामुळें नव्हे; तर गेलीं बारा वर्षें त्यांचें वास्तव्य महाराष्ट्रांत असल्यामुळें महाराष्ट्र जनतेचा त्यांच्यावर विशेष हक्क असल्याच्या जाणिवेनें. सातशें वर्षांपूर्वीं गुजराथेंतून महाराष्ट्रांत येऊन श्रीचक्रधरस्वामींनीं ज्याप्रमाणें महाविदर्भांत महानुभाव पंथ स्थापन केला आणि त्या वेळीं बाल्यावस्थेंत असलेल्या मराठी भाषेला देववाणीची प्रतिष्ठा प्राप्त करून दिली, त्याप्रमाणें महात्माजीनीं बारा वर्षांपूर्वीं महाराष्ट्रांत स्थायिक होऊन आपल्या सत्याग्रहधर्माचें सर्वांगीण केंद्र वर्धातीरावर निर्माण केलें आणि आपल्या रचनात्मक कार्याची कर्मभूमि होण्याचा मान महाराष्ट्राला दिला. हा त्यांचा महाराष्ट्रभूमीशीं जडलेला जिव्हाळा लक्षांत घेऊनच महाराष्ट्र एकीकरणाच्या प्रश्नाचा त्यांनीं सक्रिय पुरस्कार करावा आणि तो यशस्वी रीतीनें सोडविण्याचें श्रेय घ्यावें, अशी विनंति या मराठी भाषेच्या व्यासपीठावरून त्यांना मी आज जाहीर रीतीनें करीत आहें. त्यांचा पाठिंबा जर या प्रश्नाला मिळाला, तर राष्ट्रसभेच्या महाराष्ट्रीय नेत्यांत त्याविषयीं जी विलक्षण उदासीनता दृष्टीस पडते, ती नष्ट होऊन ते तो प्रश्न धसाला लावण्यासाठीं ईर्ष्येनें प्रवृत्त होतील, याबद्दल मला शंका नाहीं.

## वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक—

महाराष्ट्र एकीकरणाच्या मूलभूत प्रश्नाविषयीं जे राष्ट्रनेते इतके उदासीन आहेत, त्यांचें वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक यांच्या परिस्थितीकडे काय लक्ष असणार? वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक हे महाराष्ट्राचे तीन निरनिराळ्या राज्यसत्तांखालीं असलेले तुटक भाग मिळून एकंदर सुमारें नव्वद लक्ष लोकसंख्येचा प्रदेश होतो. उण्यापुऱ्या तीन कोट लोकसंख्येच्या महाराष्ट्राच्या या एकतृतीयांश प्रदेशाचें राजकीय भवितव्य किती अनिश्चित, किती दुर्धर आहे. याची थोडी तरी जाणीव या नेत्यांना आहे काय? वऱ्हाडवर जरी आज हैद्राबादच्या निजाम सरकारचें अधिराज्य नाममात्र असल्यासारखें दिसलें, तरी त्या सार्वभौम अधिराज्याला राज्यघटनेंत मिळालेलें कायदेशीर स्थान लक्षांत घेतां, तें उद्यां महाराष्ट्राच्या एकीकरणाला मारक झाल्याविना

रहाणार नाहीं हें निश्चित. मराठवाडा हा तर निजामराज्याचा एक बोलून चालून महत्त्वाचा घटक. शिक्षणस्वातंत्र्य, भाषणस्वातंत्र्य आणि मुद्रणस्वातंत्र्य या तिहींचाहि अभाव असलेल्या महाराष्ट्राच्या या आदिभूमींतील मराठीच्या संतानांचा आज जो सर्व बाजूंनीं कोंडमारा चालू आहे, त्याला उपमा शोधा-वयाला सतराव्या शतकातील जुलमी बेजबाबदार मोगल राजवटीकडेच खरो-खरी वळावें लागेल. अल्पसंख्यांचें राजकीय प्राबल्य कायम ठेवण्यासाठीं बहु-संख्य प्रजेची पद्धतशीर पायमल्ली आणि पिळणूक आज जर कुठें बेगुमान-पणानें चाललेली असेल, तर ती निजामराज्यांतील मराठवाड्यांत. निजामराज्यांत जसा उर्दू भाषेचा तसा गोमंतकांत पोर्तुगीज भाषेचा जुलूम लोकभाषेवर चाललेला असून, मराठवाड्याप्रमाणें गोव्यांतील जनतेलाहि कोणत्याच प्रकारचें विचारस्वातंत्र्य नाहीं. पण, वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक यांच्या या दुःस्थितीकडे राष्ट्रनेत्यांचें लक्ष कोठें आहे? वऱ्हाड, पुनरपि निजामाच्या सत्ते-खालीं जाणार असल्याच्या किंवा गोमंतक पोर्तुगीज सरकारकडून निजाम खरेदी करणार असल्याच्या ज्या बातम्या मध्यंतरीं उठल्या होत्या, त्यांसंबंधीं निषेधाचें एक अवाक्षर तरी श्री. शंकरराव देव, श्री. काकासाहेब गाडगीळ आणि श्री. बाळासाहेब खेर यांनीं काढलें होतें काय? वऱ्हाडचें सोयरसुतक आपल्याला जणुं कांहीं नाहींच, मराठवाडा आणि गोमंतक यांचा समावेश जणुं महाराष्ट्रांत होत नाहींच अशा बेपर्वाईच्या वृत्तीनें हे महाराष्ट्रीय नेते महाराष्ट्राच्या या तुटक भागांची जी उपेक्षा आज करीत आहेत, त्या त्यांच्या गाफीलगिरीबद्दल त्यांना काय म्हणावें ?

## तें चित्र आणि हें चित्र—

विशेषतः, आंध्र महासभेचे नेते डॉ. पट्टाभिसीताराम अय्या, संयुक्त कर्ना-टक सभेचे नेते श्री. दिवाकर आणि ओरिसाचे नेते श्री. हरिकृष्ण मेहताब यांची आपआपल्या विशिष्ट मायदेशांच्या एकीकरणाविषयींची तळमळ आणि धडपड पाहिली, म्हणजे श्री. देव, श्री. गाडगीळ आणि श्री. खेर यांच्या या अनास्थेबद्दल मनाला पराकाष्ठेचें दुःख होतें. निजामराज्यांतील आंध्र परिषदेनें प्रादेशिक स्वायत्ततेची घोषणा करून आपली मूळ मातृभूमि जो आंध्र देश त्याच्यांत अंतर्भूत होण्याचा निर्धार प्रकट करतांच 'विशाल आंध्रा' च्या धुरी-

णांनीं त्या निर्धाराचें उत्साहानें स्वागत केलें. पण मराठवाड्यानें केलेली स्वायत्ततेची मागणी किंवा गोमंतकानें केलेला 'चले जाव' चा पुकार हा मात्र महाराष्ट्रीय नेत्यांच्या उदासीनतेमुळें अरण्यरुदनाप्रमाणें जागच्या जागीं विराम पावून जिरून गेला. कोकोनाडा ते मच्छलीपट्टणपर्यंतचा प्रदेश निजामानें ब्रिटिश सरकारजवळ मागितला असल्याची बातमी प्रसिद्ध होतांच आंध्र देशाचे नेते डॉ. पट्टाभिसीताराम अय्या हे त्वेषानें कडाडले, "आंध्र देशांतील एक तसूभरहि जमीन निजामाला मिळणार नाहीं. शेवटला मनुष्य आणि शेवटला रुपया शिल्लक असेपर्यंत आंध्रदेश या मागणीला विरोध करील." (It will be resisted to the last man and last rupee.) आंध्र देशाच्या बाबतींतील डॉ. पट्टाभि यांची ही जागरूकता आणि युयुत्सा कोणीकडे! व वऱ्हाडच्या बाबतींतील श्री. शंकरराव देव यांची अनास्था आणि असावधता कोणीकडे!! 'विशाल आंध्रा'ला आज विजयानगरमच्या महाराजकुमारांसारखा खुद्द महात्माजींना हडसून खडसून जाब विचारणारा कडवा निर्भय पुढारी लाभला असल्यामुळेंच खरोखरी प्रांतिक असेंब्लीपासून तों कौन्सिल ऑफ स्टेटपर्यंत व राष्ट्रसभेच्या कार्यकारिणीपासून तों ब्रिटिश सरकारच्या मंत्रिशिष्टांपर्यंत राज्यसत्तेच्या हरएक केंद्रस्थानीं आंध्रांची स्वतंत्र प्रांतघटनेची मागणी दुमदुमत राहिलेली नाहीं काय? उलट, महाराष्ट्रांत संस्थानिक आणि सरदार, सत्याग्रही आणि मुत्सद्दी यांची रेलचेल असतांना देखील संयुक्त महाराष्ट्र सभा चालू शकली नाहीं, महाराष्ट्र विद्यापीठ निघूं शकलें नाहीं आणि महाराष्ट्र एकीकरणाची कैफियत ब्रिटिश सरकारपुढें दाखल होऊं शकली नाहीं. ओरिसाचीं जीं संस्थानें आज शेजारच्या प्रांतांतून सामील केलीं गेलेलीं आहेत, त्यांचा समावेश ओरिसांत करण्यांत यावा, म्हणून त्याचे प्रधानमंत्री श्री. हरिकृष्ण मेहताब यांनीं ब्रिटिश मंत्रिशिष्टांना ओरिसाचें निवेदन सादर केलें आहे. पण महाविदर्भांतील बस्तर आणि राजनांदगांव यांच्यासारखीं जीं संस्थानें महाकोसलमध्यें मोडलीं जातात, त्यांना मराठी प्रदेशांत समाविष्ट करून घेण्यासाठीं कोणत्याहि प्रकारची हालचाल करण्याची निकड महाराष्ट्रीय नेत्यांना वाटत नाहीं. आंध्र, कर्नाटक, बलुचिस्थान, दिल्ली वगैरे प्रांतांना आगामी पुनर्घटनेंत स्वायत्तता मिळण्याचीं स्पष्ट चिन्हें आतां दिसत आहेत. पण, अशा या स्थित्यंतराच्या वेळींसुद्धां महाराष्ट्र एकीकरणाचा प्रश्न कायदेशीर रीत्या धसाला लावण्याचा प्रयत्न महाराष्ट्रीय

नेत्यांकडून अद्याप कोणत्याच प्रकारें झालेला दिसत नाहीं. डॉ.पट्टाभिसीताराम अय्या, श्री. दिवाकर आणि श्री. हरिकृष्ण मेहताब यांची आपआपल्या मायदेशांच्या हितसंबंधांविषयीं जी जागरूकता आणि तत्परता पदोपदीं प्रत्ययाला येत आहे, ती जर श्री. शंकरराव देव, श्री. काकासाहेब गाडगीळ आणि श्री. बाळासाहेब खेर यांच्या ठिकाणीं असती, तर महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं महात्माजींना त्रास देण्याची काय गरज पडती ? पण, त्यांच्या ठिकाणीं अशा प्रकारची तळमळ यत्किंचितहि नसल्यामुळेंच खरोखरी आज महात्माजींकडे धाव घेण्याचा प्रसंग आला आहे. मला उमेद आहे कीं, ता. १९ एप्रिल १९४२ च्या 'हरिजना'च्या अंकांत लिहिलेल्या लेखांत "प्रस्तुत संकटाचा अंत झाल्यावर एक नवीन दृश्य आणि नवीन व्यवस्था दिसेल" अशी जी आशा गांधीजींनीं व्यक्त केली होती, ती सफल झाल्यावर तरी त्या नवीन दृश्यांत आणि नवीन व्यवस्थेंत संयुक्त महाराष्ट्र निर्माण झालेला आमच्या दृष्टीस पडेल.

## सरहद्दीवर होत असलेली पिच्छेहाट—

जिथें नव्वद लक्ष लोकसंख्येच्या सलग मराठी प्रदेशाच्या भवितव्याबद्दल इतकी अनास्था आहे, तिथें महाराष्ट्राच्या चतुःसीमांवरील जे मराठीभाषी भाग भिन्नभाषी भागांत दडपले गेलेले आहेत, त्या भागांत चालू असलेल्या मराठीच्या पिच्छेहाटीची कोण दाद घेणार ? मध्यप्रांत—वऱ्हाडांतील भंडारा, बालाघाट, छिंदवाडा, बैतूल आणि निमाड या जिल्ह्यांत, मुंबई प्रांतांतील बेळगांव, सोलापूर आणि कारवार या जिल्ह्यांत व हैद्राबाद संस्थानांतील बिदर, गुलबर्गा, उस्मानाबाद, निजामाबाद आणि अदिलाबाद या जिल्ह्यांत मराठीचा हिंदी, कानडी आणि तेलगु यांच्याशीं जो संघर्ष चालू आहे, त्यामुळें मराठी त्या त्या भागांतून हळूहळू हटत चालली असून, लवकरच हे सरहद्दीवरील भाग महाराष्ट्राला कायमचे पारखे होतील, अशी भीति वाटते. ज्या ठिकाणीं जिल्ह्याचें शहर मराठी असतें, तिथें इतर भाषांचा संसर्ग हा मराठीला सहसा अपायकारक होत नाहीं. पण जिथें जिल्ह्याचें शहर हें अन्यभाषी असतें आणि भोंवतालचे कांहीं तालुके तेवढेच फक्त मराठी असतात, तेथें मात्र त्या शहरांतील आणि जिल्ह्यांतील स्थानिक स्वराज्यसंस्था मराठीची गळचेपी केल्याशिवाय सहसा रहात नाहींत, असा निदान मध्यप्रांत—वऱ्हाडांतील तरी आमचा अनुभव

आहे. भंडारा, बैतुल, छिंदवाडा वगैरे जिल्ह्यांतून कांहीं ठिकाणीं डिस्ट्रिक्ट कौन्सिलें आणि म्युनिसिपालिट्या यांनीं मराठी शाळा बंद करून तेथें हिंदी शाळा सुरू केल्याच्या तक्रारी नेहमीं कानावर येत असतात. खुद्द नागपूर आणि वर्धा या मराठी जिल्ह्यांतहि म्युनिसिपालिटी आणि राष्ट्रसभेच्या स्थानिक समित्या यांनीं आपल्या प्रकाशनांतून मराठीऐवजीं हिंदीला प्राधान्य दिल्याचीं उदाहरणें माझ्या पहाण्यांत आहेत. पण, मराठीचें स्थान हिंदीला देण्याच्या या अन्याय्य प्रवृत्तीला जर विरोध केला, तर राष्ट्रभाषेचा द्रोह केल्याचा आरोप माथीं बसतो हें विशेष! नागरी लिपि आणि हिंदी भाषा या राष्ट्रलिपि आणि राष्ट्रभाषा म्हणून हिंदुस्थानांत प्रसृत करण्याची कल्पना पं. मदनमोहन मालवीय यांनीं काढतांच कै.लो. टिळक यांनीं तिचा किती निष्ठेनें पुरस्कार केला आणि 'केसरी'तून हिंदीचा प्रचारहि किती दक्षतेनें केला, हें प्रसिद्धच आहे. ज्या महाराष्ट्रानें हिंदीला राष्ट्र-भाषा म्हणून इतक्या तत्परतेनें मान्यता दिली आणि सप्रे, पराडकर, आगरकर, खाडिलकर, कालेलकर प्रभृति उत्कृष्ट हिंदी लेखक निर्माण केले, त्या महाराष्ट्रांतील जनता राष्ट्रभाषेचा द्रोह करील, हें कसें शक्य आहे ? पण, राष्ट्रभाषेचे अभिमानी हे जेव्हां त्या त्या प्रांतांतील बहुसंख्य जनतेच्या मातृभाषेचें स्थान राष्ट्रभाषेला देण्याचा उपद्याप करितात, तेव्हां त्यांच्या त्या अतिक्रमणाला प्रतिकार करणें, हें खरोखरी कर्तव्य होऊन बसतें. महाराष्ट्राच्या चतुःसीमांवरील हे सरहद्दींच्या गुंतागुंतीचे बिकट प्रश्न त्या त्या भागाच्या प्रतिनिधींची किंवा त्रयस्थांची सीमा-समिति नेमून सोडवावे लागतील, ही गोष्ट खरी. पण, तोंपर्यंत महाकोसल, महाराष्ट्र, कर्नाटक आणि आंध्र या चारी राष्ट्रकांतील लोकांनीं, आक्रमक धोर-णाचा अवलंब न करतां, एकमेकांच्या भाषांचा जिथें निकट संबंध येतो, तिथें सहिष्णुतेनें आणि स्नेहभावानें वागण्यांतच राष्ट्रीयत्वाच्या भावनेचा खरा गौरव नाहीं काय ?

## नभोवाणीच्या योजनेंतील भेदनीति—

प्रांतिक भाषांतील या स्पर्धेमुळें जें वैमनस्य प्रांताप्रांतांतून उत्पन्न झालें आहे, तें पुरेसें वाटत नसल्यामुळेंच कीं काय, हिंदुस्थान सरकारनें नभोवाणीच्या विस्ताराची जी योजना (Basic Plan for the Development of Broad-casting in India) तयार केली आहे, तींत फाटाफुटीचीं आणखी विष-

बीजें पेरलेलीं आढळतात. या योजनेचा १९४५ च्या सप्टेंबरमध्यें दुरुस्त केलेला नवा मसुदा नुकताच छापून सरकारनें तो नभोवाणी आणि वार्ता या दोन्ही खात्यांशीं संबंध असलेल्या सर्व अधिकाऱ्यांकडे खासगी रीतीनें (Confidential-for official use only) अभिप्रायार्थ पाठविला आहे. या मसुद्यांत त्या त्या भागांतील मुख्य प्रांतिक भाषेबरोबरच स्थानिक बोलींतूनही नभोवाणीचे कार्यक्रम करण्याचा आपला संकल्प सरकारनें प्रकट केला आहे. वस्तुतः, हिंदुस्थानांतील भाषा आणि बोली याच्या सद्यःस्थितीविषयीं या योजनेंत असे मार्मिक उद्गार काढण्यांत आलेले आहेत कीं, "प्रमुख भाषांचे स्थानिक प्रकार हे हळुहळू त्या त्या भागांतील ग्रांथिक किंवा सुप्रगत भाषेंत लुप्त होत आहेत. प्रवास आणि शिक्षण यांच्यामुळें त्यांचा लोप लवकर होईल असें मानलें, तरीहि त्याला शंभर वर्षें लागतील. पण नभोवाणी हा कालावधि कदाचित् एक दोन पिढ्यांनीं कमी करूं शकेल. (The local forms of the major languages are gradually tending towards a common standard, which may be either the literary form or the one used by the most advanced of the population groups sharing that language. This process will be hastened by the growth of travel and education but may well take a century to complete Broadcasting can perhaps cut the time down to one or two generations.) स्वतःच विशद केलेल्या या सोज्वळ तत्त्वांनुसार मुख्य प्रांतिक भाषांतूनच नभोवाणीकेंद्रें उघडण्याच्या धोरणाचा अवलंब जर सरकारनें केला असता, तर तें सरळपणाचें आणि प्रामाणिकपणाचें झालें नसतें काय? पण, हें तत्त्वज्ञान सांगितल्यानंतर प्रांतांतिल प्रमुख एकोणीस भाषा आणि त्यांच्या स्थानिक बोलींचे शहात्तर प्रकार यांची यादी देऊन नंतर सरकारनें असा निर्णय दिला आहे कीं, "सामान्यतः एक लाख लोक जी भाषा बोलतात, त्या प्रत्येक बोलीसाठीं नभोवाणीचा वेगळा स्वतंत्र कार्यक्रम ठेवणें आवश्यक होईल; व म्हणून वर दिलेल्या खेडुत बोलींचा आंकडा शहात्तरांवरून सवाशेंच्या जवळपास न्यावा लागेल." (It will in all, probability, be necessary to have seperate programmes

in every dialect which is spoken by not less than a lakh of people and the number of rural languages given above as 76 will have to be increased to the neighbourhood of 125 ) या योजनेंत मराठीचे (१) देशी मराठी, (२) कोंकणी मराठी, (३) वऱ्हाडी मराठी, (४) गोंडी मराठी आणि (५) कोंकणी असे पांच प्रकार कल्पिलेले असून, खेडेविभागांतील केंद्रांतून यापैकीं बहुतेक बोलींतून कार्यक्रम होतील, असें दिसतें. उदाहरणार्थ चांदा येथील कार्यक्रम गोंडी भाषेंतून होण्याचा दृढ संभव आहे. नभोवाणीच्या विस्ताराची जी ही योजना हिंदुस्थान सरकारनें तयार केली आहे, तिच्यामुळें हिंदुस्थानांतील भाषाभेद कमी होतील कीं वाढतील? सरकारला हें कळावयाला नको काय कीं, नभोवाणीचा आश्रय जर दर बारा कोसांवर बदलत गेलेल्या प्रत्येक बोलीला मिळाला, तर ती बोली त्या प्रांतांतील ग्रांथिक भाषेंत विलय पावण्याऐवजीं उलट वाढीला लागेल? खेडेविभागांतून सुद्धां प्रांताच्या मुख्य ग्रांथिक भाषेंतून कार्यक्रम करून त्या सुसंस्कृत भाषेच्या छत्राखालीं प्रांतांतील सर्व जातींना आणि सर्व वर्गांना आणण्याऐवजीं प्रत्येक बोलींतून वेगळे कार्यक्रम ठेवून सरकार ग्रांथिक भाषांच्या प्रगतीला आणि प्रसाराला पर्यायानें आळा घालण्याचा डाव खेळत आहे, अशी शंका लोकांना कां येऊं नये? या योजनेंत (१) दिल्ली, (२) अलाहाबाद, (३) कलकत्ता, (४) मुंबई आणि (५) मद्रास असे जे पांच विभाग (Zones) नभोवाणी केंद्रांसाठीं पाडले आहेत, तेहि सर्वत्र वाद आणि विरोध निर्माण करावयाला कारण होतील. उदाहरणार्थ, पूर्व हिंदुस्थानी विभागांत म्हणजे अलाहाबाद केंद्रांत गोंदियासारख्या मराठी तहसिलीचा समावेश केलेला महाराष्ट्रीयांना कसा योग्य वाटेल? या योजनेंतील महाराष्ट्र एकीकरणाच्या दृष्टीनें अभिनंदनीय असा गुण फक्त येवढाच आहे कीं, महाविदर्भ आणि मराठवाडा हे महाराष्ट्राचे दोन्ही विलग घटक मुंबई केंद्राला जोडण्यांत येणार असल्यामुळें नभोवाणीपुरतें तरी साऱ्या मराठीभाषी प्रदेशांचें एकीकरण सिद्ध होइल! पण, एवढा एक गुण वगळल्यास ही योजना सर्वच प्रांतिक भाषांच्या दृष्टीनें हानिकारक असल्यामुळें, महाराष्ट्रप्रमाणेंच इतरहि प्रांतांतील साहित्यिक आणि पत्रकार यांना तिचा निषेध करून, प्रांतिक भाषांच्या प्रसाराला पोषक असे बदल तिच्यांत घडवून आणण्यासाठीं सहकारितेनें प्रयत्न करावे लागतील.

## महाराष्ट्र विद्यापीठ आणि टिळक महाराष्ट्र विद्यापीठ—

ग्रांथिक भाषेला स्थैर्य, गांभीर्य आणि सौंदर्य येऊन तिचा प्रसार समाजाच्य
अगदीं खालच्या थरापर्यंत होण्यासाठीं त्या भाषेचें स्वतंत्र विद्यापीठ स्थाप
होणें अवश्य असतें; व जयकर समितीनें पुणें विद्यापीठाची योजना तयार करू
जें मार्गदर्शन या बाबतींत मुंबई सरकार आणि मराठी जनता यांना केलें, त्या
बद्दल त्या समितीचें अभिनंदन केलें पाहिजे. पण, या संयोजित विद्यापीठा
स्वरूप प्रादेशिक असलें, तरी मराठी माध्यम प्रयोगादाखल सुरू करण्याच्य
बाबतींतसुद्धां जयकर समितीनें ज्या मर्यादा घातल्या आहेत, त्या लक्षांत घे
मराठीचें विद्यापीठ या दृष्टीनें त्याला वैगुण्य येतें, असें म्हटल्यास तें गैर होणा
नाहीं. उच्च शिक्षण मराठींतून देणें हाच मराठीमध्यें जगांतील सर्व ज्ञान आण
ण्याचा आणि महाराष्ट्र संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाचा एकमेव उपाय आहे. य
दोन्ही बाबतींत पुणें विद्यापीठाचा उपयोग व्हावा तितका होईल, असें वाट
नाहीं. अर्थात् मराठी भाषेच्या माध्यमांतून सर्व शिक्षण देणाऱ्या आणि महारा
संस्कृतीच्या पुनरुज्जीवनाचें ध्येय डोळ्यांपुढें ठेवून ज्ञानोपासना करणाऱ्य
विद्यापीठाची उणीव शिल्लक रहातेच. ती भरून काढण्याचें कार्य टिळक महा
राष्ट्र विद्यापीठाकडून व्हावें अशी माझी अपेक्षा आहे. व त्या विद्या
पीठाचे कुलगुरु श्री. बाळासाहेब खेर आणि प्रमुख श्री. शंकररा
देव यांनीं त्याच्या पुनर्घटनेचा जो संकल्प केला आहे, तो सिद्धीस गेल्यास
विद्यापीठ महाराष्ट्र संस्कृतीच्या संवर्धनाचें केंद्र होऊन बसेल, अशी मला उमेद
वाटते. महाराष्ट्र विद्यापीठ अद्याप अस्तित्वांत आलेलें नसल्यामुळें, मराठीच्य
स्वतंत्र अध्ययनाची किंवा स्वतंत्र पदवीपरीक्षा घेण्याचीही व्यवस्था होऊं शक
नाहीं. महाराष्ट्र साहित्य परिषद आणि मराठवाडा सहित्य परिषद यांनीं सुरु
केलेल्या मराठीच्या पदवीपरीक्षांचा उपक्रम त्या दृष्टीनें खचित प्रशंसनीय आहे
पण, या परीक्षांना विद्यापीठें आणि प्रांतिक सरकारें यांची मान्यता जोंपर्यंत
मिळत नाहीं, तोंपर्यंत त्यांना खरें महत्व येणें अशक्य आहे. महाराष्ट्र साहित
परिषद आणि मराठवाडा साहित्य परिषद यांच्यासारख्या जबाबदार संस्थांकडू
ज्या परीक्षा घेतल्या जातात, त्याना विद्यापीठें आणि सरकारें यांनीं खरोखर
कृतज्ञताबुद्धीनें मान्यता देणें, हेंच त्यांचें कर्तव्य ठरत नाहीं काय ? पंजाब आणि

[illegible]लाहाबाद या दोन्ही विद्यापीठांनीं हिंदी साहित्यसंमेलनाच्या अशा प्रकारच्या [illegible]रीक्षांना मान्यता देऊन हिंदीच्या स्वतंत्र अध्ययनाला एका परीनें प्रोत्साहन [illegible]लें आहे. मग मुंबई, नागपूर आणि उस्मानिया या तिन्ही विद्यापीठांना [illegible]हाराष्ट्र साहित्य परिषद आणि मराठवाडा साहित्य परिषद यांच्या परीक्षांना [illegible]ान्यता देणें इतकें अवघड कां वाटावें ? विद्यापीठें आणि सरकार यांच्याकडून [illegible]ोपर्यंत या परीक्षांना मान्यता मिळत नाहीं, तोंपर्यंत शिक्षणखातें या पदवी-[illegible]रांचा उपयोग करून घेणार नाहीं. युद्धोत्तर शैक्षणिक पुनर्घटनेची सार्जंट [illegible]ोजना जर खरोखरी अमलांत येणार असेल तर सरकारला लाखों शिक्षकांची [illegible]रज लागेल. मग पंजाब आणि अलाहाबाद या विद्यापीठांप्रमाणें महाराष्ट्र [illegible]ाहित्यपरिषदेच्या परीक्षांना मान्यता देऊन सरकारनें त्या पदवीधरांचा आपल्या [illegible]शिक्षणप्रसाराच्या कार्यांत कां उपयोग करून घेऊं नये ? मुंबई आणि मध्यप्रांत-[illegible]ऱ्हाड येथें नुकतीच स्थापन झालेलीं कॉंग्रेस मंत्रिमंडळें या सूचनेचा विचार [illegible]करतील काय ?

## [illegible]रें लोकवाङ्मय केव्हां निर्माण होईल ?—

मराठी भाषेची प्रतिष्ठा आणि प्रभाव वाढविण्यासाठीं महाराष्ट्राचें एकी-[illegible]करण आणि महाराष्ट्र विद्यापीठाची स्थापना या दोन गोष्टी जितक्या आवश्यक [illegible]आहेत, तितकीच आणखीहि एक गोष्ट आवश्यक आहे ती ही कीं, मराठी [illegible]ाहित्यानें महाराष्ट्राच्या जीवनाच्या सगळ्या कक्षा व्यापल्या पाहिजेत, महाराष्ट्र [illegible]जनतेचे सगळे उच्चनीच थर आपल्या संचारानें आणि संस्कारानें सचेतन [illegible]आणि संघटित केले पाहिजेत किंबहुना, मराठी भाषेचें सामर्थ्य आणि वैभव हें [illegible]खरोखरी मी त्याच दिवशीं वाढीला लागलें असें समजेन कीं, ज्या दिवशीं [illegible]महाराष्ट्रांतील प्रत्येक खेड्यांत आणि घरांत मराठी उत्सुकतेनें लिहिलें वाचलें [illegible]जाईल. कोणतीहि भाषा जी उत्कर्षाला चढते ती राज्यसत्तेच्या किंवा विद्या-[illegible]पीठाच्या आश्रयानें नव्हे; तर ज्या बहुजनसमाजाच्या जिव्हाग्रावर ती नाचत [illegible]असते आणि हृदयांत प्रतिध्वनित होत असते, त्या बहुजनसमाजाच्या जीवनाचा [illegible]जोम आणि जिव्हाळा तिच्यांत भिनल्यामुळें ! आज मराठी वाङ्मय ही केवळ [illegible]मूठभर पांढरपेशा वर्गाची मिरास होऊन बसली आहे. बहुजनसमाज हा निर-

क्षर असल्यामुळें ‘ साहित्य ’ म्हणून ज्याला म्हणतात त्याच्याशीं त्याचा कांहीं संबंध येत नाहीं हें एक; व दुसरें असें कीं धर्म, जाति आणि वर्ग यांनीं महाराष्ट्र समाजांत नाना प्रकारचे सांस्कृतिक थर उत्पन्न केलेले असल्यामुळें मराठी भाषेची हाक आज दुर्दैवानें समाजाच्या या साऱ्या थरांना सारख्याच आर्ततेनें किंवा उत्साहानें हालवूं शकत नाहीं. ब्राह्मण आणि ब्राह्मणेतर, जैन आणि लिंगायत, यहुदी आणि पारशी, ख्रिस्ती आणि मुसलमान, अस्पृश्य आणि वन्य वगैरे जे नाना धर्मांचे, वंशांचे आणि जातींचे लोक महाराष्ट्रांत राहतात, त्यांची भाषा वस्तुतः मराठीच असावयाला नको काय ? पण, मराठी ही जणुं महाराष्ट्रांतील फक्त हिंदु समाजाची भाषा आहे, अशा भावनेनें मुसलमान, यहुदी, पारशी आणि ख्रिस्ती हे भिन्नधर्मीय समाज तिच्याकडे पहातात. त्यामुळें, मराठी साहित्याच्या चित्रणाच्या आणि आकर्षणाच्याहि कक्षेंतून महाराष्ट्रांत शतकांनुशतकें रहात आलेले हे भिन्नधर्मी समाज वगळले गेले आहेत. ही स्थिति बदलली पाहिजे. मराठीची हांक कानांवर पडतांच धर्म, जाति, पंथ आणि वर्ग यांचे सारे कृत्रिम भेद विसरून जाऊन महाराष्ट्रांतील प्रत्येक मनुष्य आपण ‘ मराठा ’ असल्याच्या एकच एक जाणिवेनें ज्या दिवशीं उठेल तो राष्ट्रीयत्वाचा खरा सुदिन ! नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलेल्या महाराष्ट्राची अस्मिता मराठी जनतेच्या जीवनांतून कोटिकलांनीं प्रकट होऊं लागली, असें त्याच दिवशीं आपण अभिमानानें म्हणूं शकूं; व त्या जीवनापासून ओज आणि तेज घेतलेलें खरें लोकवाङ्मयहि त्याच दिवशी निर्माण होईल.

**नवमहाराष्ट्राचें उत्थान—**

आणि त्या लोकवाङ्मयांतूनच उद्यांचा नवमहाराष्ट्र आविर्भूत होईल. आज महाराष्ट्राचें जिवन खुरटें आणि दुबळें आहे; आपल्याला दरिद्री आणि मागासलेले म्हणवून घेण्यांत त्याला एक प्रकारचा अनुकंपनीय अभिमान वाटतो. आपल्या भौतिक संपत्तीचें त्याला ज्ञान नाहीं आणि बौद्धिक सामर्थ्याचा त्याला विश्वास नाहीं. पाश्चात्य संस्कृतीच्या संघर्षामुळें त्याचें जुनें जिवन उध्वस्त झालें आहे आणि नवें अद्याप उत्पन्न व्हावयाचें आहे. त्या नव्या जीवनाच्या निर्मितीसाठीं कोणतीं तत्त्वें समाजाचीं धारक म्हणून स्वीकारावींत, कोणतीं मूल्यें आपल्या उन्नतीला पोषक म्हणून अंगीकारावींत, याचा निश्चय अद्याप त्यानें

केलेला नाहीं. एक प्रकारच्या संभ्रांत, संत्रस्त मनःस्थितींत तो आज आहे. विशेषतः नुकत्याच संपलेल्या महायुद्धांत समाजाच्या धारणेचीं आणि उन्नतीचीं जुनीं आणि नवीं सारींच तत्त्वज्ञानें आपआपल्या परीनीं हिणकस ठरून मानव्याच्या सर्वांगीण विकासाला अपुरीं पडतात असें सिद्ध झाल्यामुळें तर हें बौद्धिक अराजक सध्यां पराकोटीला गेलें आहे. या अराजकाच्या आणि अनिश्चयाच्या परिस्थितींतून नवमहाराष्ट्र निर्माण करण्याची जबाबदारी स्वतःच्या किंवा स्वपक्षाच्या तात्कालिक यशाच्या दृष्टीनें राजकारणाकडे पहाणाऱ्या हंगामी राजकीय नेत्यांपेक्षांहि तत्त्वज्ञानी, समाजशास्त्री, साहित्यिक आणि पत्रकार यांच्यावरच जास्त नाहीं काय? सह्याद्रि आणि सातपुडा यांच्या दुर्गम रांगांनीं विभागलेल्या महाराष्ट्रांत केवळ प्रादेशिक एकात्मतेचाच नव्हे, तर सामाजिक आणि राजकीय एकात्मतेचाहि जो अभाव दृष्टीस पडतो, तो नष्ट झाल्याशिवाय आजच्या उध्वस्त आणि विच्छिन्न मराठी जनसमाजांतून नवमहाराष्ट्र निर्माण होणार नाहीं. म्हणून, भाषिक, प्रादेशिक, सामाजिक आणि राजकीय दृष्ट्या आपण एक आहोंत, नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत सारा मराठी समाज हा एकात्म आणि एकसंध आहे, ही जाणीव वाढीस लावण्यासाठीं महाराष्ट्रांतील सर्व जातींना, धर्मांना आणि वर्गांना मानव्याच्या मूलभूत हक्कांचें प्रांजळ अभिवचन देण्यांत आलें पाहिजे. भारतीय राष्ट्रसंघांतील आपलें इतिहाससिद्ध स्थान प्रभुत्वानें घ्यावयाला समर्थ असलेला संयुक्त नवमहाराष्ट्र त्या एकात्मतेच्या जाणिवेंतूनच अवतीर्ण होईल.

## मंडनाचा, नव्हे रक्षणाचा विचार—

मित्रहो! माझें हें आतांपर्यंतचें भाषण ऐकून आपला खचित विरस झाला असेल. कारण या भाषणांत न लालित्याचा विलास, न पांडित्याचा प्रकर्ष; न कलेच्या सगुण स्वरूपाची चर्चा, न साहित्याच्या निर्गुण तत्त्वांचें विश्लेषण; न आजच्या वाङ्मयाचें समालोचन, न उद्यांच्या वाङ्मयाचें दिग्दर्शन. विशेषतः, महाराष्ट्र साहित्यपरिषदेच्या नवीन घटनेनुसार यंदांचें हें माझें अध्यक्षपद ललित विभागापुरतेंच मर्यादित केलेलें असल्यामुळें तर, मी वाङ्मयाच्या वैदग्ध्याविषयीं कांहीं तरी बोलावयाला हवें होतें, याची मला कल्पना आहे. म्हणूनच मी प्रांजळपणानें आपल्याला विनंति करितों कीं, या औचित्यभंगाबद्दल मला

आपण क्षमा करा. पण, हा औचित्यभंग मी बुद्धिपुरःसर केलेला आहे, हेंहि त्याबरोबरच आपल्याला स्पष्ट सांगितलें पाहिजे. माझ्या मतें, महाराष्ट्रापुढें जो आज मुख्य प्रश्न आहे, तो मराठी भाषेच्या लालनाचा आणि मंडनाचा नव्हे, तर रक्षणाचा आणि भवितव्याचा आहे. नर्मदेपासून तुंग-भद्रेपर्यंत पसरलेल्या महाराष्ट्राचें जोंपर्यंत एकीकरण होत नाहीं, तोंपर्यंत मराठी भाषा आणि साहित्य यांचा सर्वांगीण उत्कर्ष होणें अशक्य आहे. पण, ज्या या एकच एक प्रश्नावर मराठी भाषेचें भवितव्य अवलंबून आहे, त्याविषयीं तर महाराष्ट्राच्या राजकीय नेत्यांतहि विलक्षण उदासीनता! ही उदासीनता नष्ट करून महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं झटण्याची ईर्ष्या शक्य तर त्यांच्या ठिकाणीं उत्पन्न करावी, एवढ्याच एका हेतूनें मराठी साहित्याच्या या अग्रासनावर आरूढ होण्याचें धाडस मीं केलें. कारण, मी हें जाणून आहे कीं, या अग्रासनावरून फोडलेली हांक नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत सर्व महाराष्ट्रांत दुमदुमेल, सह्याद्रीच्या आणि सातपुड्याच्या साऱ्या दऱ्याखोऱ्यांत तिचे प्रतिध्वनि उफाळून उठतील. या अग्रासनाचा हा प्रभाव लक्षांत घेऊनच मी, मराठी लेखक आणि पत्रकार यांच्या वतीनें, महाराष्ट्र एकीकरणासाठीं झटण्याची हांक महाराष्ट्रांतलि सर्व पक्षांच्या, जातींच्या आणि धर्मांच्या कार्यकर्त्यांना देत आहें. त्या हांकेनुसार महाराष्ट्रांतील कार्यकर्ते त्याच्या एकी-करणासाठीं झटावयाला जर खरोखरीच उद्युक्त झाले, तर आपण मला दिलेल्या या बहुमानाचें सार्थक झालें, असें मी तरी समजेन.

# परिशिष्ट

श्री. माडखोलकर यांच्या भाषणांत उल्लेखिलेले आणि उद्धृत केलेले ' हरिजनां ' तील लेख आणि पत्रव्यवहार दोन्ही संपूर्ण पुढें दिले आहेत.

(१)

ता. २९ मार्च १९४२ च्या मराठी ' हरिजन ' च्या अंकांत पृष्ठ ३९ वर म. गांधी यांचा पुढील लेख प्रसिद्ध झाला होता :—

## आंध्र लोक—

विजयागनरम्‌चे महाराजकुमार विजयानंद ह्यांनीं पुढील मजकूर मजकडे पाठविला आहे:—

" आमच्या आंध्र लोकांची अशी दृढ भावना झालेली आहे कीं, आपणांला आह्मी लोक आवडत नाहीं आणि आमचा स्वतंत्र आंध्र प्रांत बनविण्याच्या व स्थापण्याच्या आपण विरुद्ध आहांत. आंध्र प्रांत हा पूर्णपणें कॉंग्रेस मनोवृत्तीचा असूनीह आपले आशीर्वाद त्याला लाभलेले नाहींत. जर आंध्र देशांतील तीन कोटी लोकांचीं हृदयें आपल्या स्वतंत्र अस्तित्वासाठीं तळमळत असतील, तर थोर टिळक महाराज म्हणत त्याप्रमाणें त्यांना 'चुका करण्याचा हक्क' कां देण्यांत येऊं नये? आंध्र लोक आपणांला आवडत नाहींत, ह्याबद्दल येथल्या लोकांची इतकी खात्री झालेली आहे कीं, परवां आपण बनारसला गेलांत, तेसुद्धां मला आंध्र प्रांत स्वतंत्र व्हावा म्हणून मी करीत असलेली चळवळ थांबविण्याचें सांगण्याकरितां गेलांत असें ते म्हणत आहेत. आंध्र प्रांताबाबत आपण तामिलनाडच्या मंडळींना काहीं सल्ला दिला काय? त्याचप्रमाणें कॉंग्रेस दिवाणगिरीच्या कारकीर्दींत आंध्र प्रांताचा प्रश्न आपणांकडे पाठविला गेला होता किंवा नाहीं, आणि पाठविला गेला असल्यास आपण त्यांना त्याबाबत काय सल्ला दिलात, ही सर्व माहिती आंध्र मंडळींना पाहिजे आहे. आंध्रप्रांताचा आणि कर्नाटक व केरळ प्रांतांचा प्रश्न आपण सारखाच मानतां काय? कर्नाटक व केरळ प्रांतांचें उत्पन्न त्यांना स्वतंत्र प्रांत बनविण्याइतकें कदाचित् नसावें. आंध्र प्रांत स्वाश्रयी होऊं शकेल कीं नाहीं, ह्याबद्दल आपलें काय मत आहे, तेंहि आपण कृपा करून कळवावें. ओरिसा प्रांताला ज मिळवितां आलें, तें आंध्र लोकांना केवळ ते दृढ कॉंग्रेसनिष्ठ आहेत म्हणूनच मिळवितां आलें नाहीं, ही वस्तुस्थिति नाहीं काय? हिंदुस्थानांत सायमन कमिशन आलें त्या वेळीं आंध्र लोकांनीं निराळें धोरण ठेवलें असतें, तर आज त्यांना पाहिजे तें मिळालें असतें, अशी येथल्या लोकांची समजूत आहे."

महाराजकुमार हे वाईट लोकांच्या तावडींत सांपडले आहेत, एवढेंच मी म्हणूं शकतों. बहुजनसमाजाशीं कसें वागावें ह्या बाबतच्या कलेंत ते अजून नवशिके आहेत, त्यामुळें आपल्याला माहिती देणारे लोक किती प्रमाणभूत

आहेत, ह्याची काळजी त्यांनीं घेतलेली दिसत नाहीं. मला त्यांनीं पाठविलेली माहिती त्यांना कोणाकडून मिळाली, हें मी जाणूं इच्छितों. मी स्वतः आंध्र देशाशीं अपरिचित नाहीं. मी महाराजकुमारांना सल्ला देतों कीं, त्यांनीं देशभक्त कोंडा व्यंकटपय्या, श्री. प्रकाशम, डॉ. पट्टाभिसीतारामय्या, श्री. कालेश्वरराव आणि श्री. सीतारामशास्त्री ह्यांना विचारावें. ते बहुधा ह्या गोष्टीची साक्ष देतील कीं, आंध्र प्रांताला भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वावर स्वतंत्र होण्याचा हक्क आहे, ही गोष्ट कॉंग्रेसकडून मींच मान्य करवून घेतली होती. त्याचप्रमाणें सरकारनेंहि भाषावार प्रांतरचना मान्य करावी, म्हणूनहि मी नेहमीं चळवळ करीत आलों आहें. किंबहुना, माझा सल्ला मागण्यांत आला, त्या वेळीं मी तामिळ-नाड प्रांताला असा सल्ला दिला कीं, त्यांनीं आंध्र मागणीला प्रतिकार करूं नये. त्याचप्रमाणें, श्री. राजगोपालाचार्य ह्यांच्या दिवाणगिरीच्या काळांत, त्या मंत्रिमंडळानें आंध्र देश स्वतंत्र प्रांत व्हावा ह्या गोष्टीला मान्यता मिळावी म्हणून पराकाष्ठेचा प्रयत्न केला आणि आज आंध्र स्वतंत्र प्रांत नसला, तर तो त्या मंत्रिमंडळाचा मुळींच दोष नाहीं, हीहि गोष्ट मला माहीत आहे. पण कॉंग्रेसनें स्वतंत्र प्रांत म्हणून मान्य केलेल्या आंध्र, केरळ, कर्नाटक किंवा दुसऱ्या कोणत्याहि प्रांताप्रांतांत मी भेद करीत नाहीं, ही गोष्ट खरी आहे. कोणचा प्रांत स्वतंत्र झाल्यास स्वाश्रयी होऊं शकेल, ही माहिती मला नाहीं. मी बनारसला कां गेलों होतों, ही गोष्ट सर्वांच्या इतकी माहितीची आहे कीं, त्याचें स्पष्टी-करण करण्याची जरूरी नाहीं. महाराजकुमार स्वतः खेळाडू आहेत आणि म्हणून त्यांनीं निराधार गर्भित आरोपांची पर्वा करूं नये. महात्म्याच्या कां होईना, दडपणामुळें आपल्या स्वीकृत मार्गापासून जो पुढारी च्युत होऊं शकतो, तो अयोग्य पुढारी म्हटला पाहिजे. मला वाटतें, महाराजकुमारांचें, किंबहुना ज्यांनीं त्यांना फसवून मला प्रश्न विचारावयास लावलें, त्यांचेंसुद्धां ह्या उत्तरानें समाधान व्हावें.

सेवाग्राम, ता. २०-२-४२
(इंग्रजीवरून)

**मो. क. गांधी**

## ( २ )

## श्री. माडखोलकर यांचें पत्र

शांतानिवास, शुक्रवार तलावासमोर,
नागपूर शहर, ता. ७–४–४२

महात्मा गांधीजी यांचे सेवेसी,

कृ. सा. न. वि. वि. नुकताच 'हरिजन' मध्यें आपण विजयानगरमूचे महाराजकुमार सर विजयानंद यांच्या प्रश्नाला उत्तर देण्याची संधि साधून आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेला जाहीर रीतीनें दिलेला पाठिंबा माझ्या पाहण्यांत आला. त्याच खुलाशांत आपण भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाचा सर्वसामान्य पुरस्कारहि पुन्हां एकदां केलेला आहे. त्यामुळें मी आपणास हें पत्र लिहून महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या प्रश्नासंबंधीं आपली भूमिका स्पष्ट करण्याची विनंति आपल्याला करीत आहें.

निजाम–हैद्राबाद वगैरे संस्थानें आणि पोर्तुगीज अंमल यांच्यांत वाटला गेलेला महाराष्ट्राचा प्रदेश जरी सोडला, तरी आज खुद्द ब्रिटिश हिंदुस्थानांत मुंबई प्रांत आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या दोन प्रांतांत महाराष्ट्र विभागला गेलेला आहे. १९२० सालीं राष्ट्रसभेचें नेतृत्व आपल्याकडे आल्यानंतर कॉंग्रेसची जी नवी घटना तयार करण्यांत आली, तींत आंध्र, गुजरात, तामिळ, कर्नाटक, महाकोसल, केरळ, ओरिसा वगैरे प्रांतांचें स्वतंत्र अस्तित्व मान्य करण्यांत येऊन त्यांना वेगवेगळ्या कॉंग्रेस समित्याहि मिळाल्या. पण महाराष्ट्राचे मात्र ( १ ) मुंबई इलाख्यांतील पश्चिम महाराष्ट्र ( २ ) मुंबई शहर ( ३ ) वऱ्हाड आणि ( ४ ) मराठी मध्यप्रांत ऊर्फ नागपूर असे चार तुकडे पडले. ब्रिटिश हिंदुस्थानाच्या राज्यकारभारांत महाराष्ट्राचे दोन तुकडे पडलेले आहेत; तर कॉंग्रेसच्या राज्यकारभारांत त्याचे चार तुकडे पडलेले आहेत.

या परिस्थितीबद्दल व्यक्तिशः आपल्याला जबाबदार धरणें किंवा दोष देणें अर्थातच योग्य होणार नाहीं, याची मला पूर्ण जाणीव आहे. १९२० सालीं कॉंग्रेसची जी नवी घटना तयार झाली, ती तयार करणाऱ्या समितींत महाराष्ट्रीय पुढारीहि होते; व महाराष्ट्राच्या एकीकरणाची आकांक्षा जर त्यांच्या मनांत उत्कटतेनें जागृत असती, तर निदान कॉंग्रेसच्या कारभारापुरता तरी संयुक्त

महाराष्ट्र त्यांना त्या वेळीं निर्माण करतां आला असता. पण त्यांच्या अनवधानतेमुळेंच बहुधा कॉंग्रेसच्या कारभारापुरतें महाराष्ट्राचें एकीकरण करण्याची ही सुवर्ण संधि वांया जाऊन उलट त्याचे चार तुकडे मात्र पडले.

महाराष्ट्राचे अशा रीतीनें अनेक तुकडे पडल्यामुळें महाराष्ट्र आणि मराठी जनता यांचें राजकीय संघटनेच्या दृष्टीनें किती नुकसान होत आहे, हें मीं आपल्याला सांगितलें पाहिजे, असें नाहीं. या नुकसानीची अलीकडे तीव्र जाणीव झाल्यामुळें गेलीं चार वर्षें संयुक्त महाराष्ट्र आणि महाविदर्भ अशा दोन प्रकारच्या चळवळी मुंबई प्रांत आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या दोन्ही प्रांतांतून चालू आहेत. महाराष्ट्रांतील आणि मध्यप्रांत-वऱ्हाडांतील कांहीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांची या चळवळीविषयीं एकंदरींत सहानुभूति आहे. पण ही चळवळ ईर्ष्येनें उचलून धरून कॉंग्रेसच्या कारभारापुरता तरी महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न सोडवून घ्यावयाला कोणताहि प्रमुख कॉंग्रेस पुढारी तयार असल्याचें दिसत नाहीं. महाराष्ट्र प्रांतिक कॉंग्रेस कमिटी, विदर्भ प्रांतिक कॉंग्रेस कमिटी आणि नागपूर प्रांतिक कॉंग्रेस कमिटी या तिन्ही कमिट्यांनीं जर महाराष्ट्राच्या एकीकरणाची आणि स्वतंत्र प्रांतघटनेची मागणी एकमुखानें केली, तर कॉंग्रेस वर्किंग कमिटी ती आनंदानें मान्य करील, अशी मला खात्री वाटते.

पण, कोणत्या कारणामुळें कोण जाणें, पश्चिम महाराष्ट्र, वऱ्हाड आणि नागपूर या महाराष्ट्राच्या तिन्ही भागांतील कॉंग्रेस पुढारी या प्रश्नाविषयीं अनुत्सुक दिसतात. जुनी फेडरल घटना काय किंवा अलीकडली क्रिप्स योजना काय त्या दोहोंनीहि प्रांतांचें स्वतंत्र अस्तित्व, घटकत्व आणि स्वायत्तत्व हीं तिन्ही गृहीत धरलेली आहेत; व भावी हिंदी राज्यघटना ही फेडरल स्वरूपाचीच राहण्याचा दृढ संभव असल्यामुळें महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या प्रश्नाची आतां उपेक्षा करणें अत्यंत अनिष्ट होईल.

म्हणून, माझी आपल्याला अशी नम्र विनंति आहे कीं, आपण स्वतः जातीनें या प्रश्नाकडे लक्ष देऊन महाराष्ट्राच्या तिन्ही भागांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांना स्पष्ट मार्गदर्शन करावें. म्हणजे या कार्याविषयींची त्यांची अनुत्सुकता नाहींशी होऊन, पश्चिम महाराष्ट्र, वऱ्हाड आणि नागपूर या तिन्ही मराठी प्रांतांतील कॉंग्रेस कमिट्यांचे प्रमुख हा प्रश्न तत्परतेनें हातीं घेतील आणि निदान

काँग्रेसच्या कारभारापुरता तरी महाराष्ट्राचा एकसंध संयुक्त प्रांत अस्तित्वांत येईल. आपल्या नेतृत्वाखालीं काम करीत असलेल्या अ. भा. चरखा संघानें आपल्या कार्यक्षेत्रात संयुक्त महाराष्ट्र पूर्वींच अंमलांत आणला आहे, हें आपल्याला माहीत आहेच. जी गोष्ट अ. भा. चरखा संघांत घडूं शकते, ती राष्ट्रसभेंत कां घडूं नये? तरी आपण ही सर्व परिस्थिति लक्षांत घेऊन आपलीं या प्रश्नावरील मतें जाहीर करावीं आणि महाराष्ट्राच्या एकीकरणाचा प्रश्न धसाला लावल्याचें श्रेय घ्यावें.

आपल्या विधायक कार्यक्रमांत आपण राष्ट्रभाषेबरोबरच मातृभाषेच्या सेवे-वरहि भर दिलेला आहे. लोकांच्या मातृभाषेचा पूर्ण विकास व्हावयाचा म्हणजे त्या मातृभाषेनें व्यापलें जाणारें क्षेत्र हें सुसंघटित आणि एकसंध असलें पाहिजे, ही गोष्ट आपल्याला खचित मान्य होईल. मातृभाषा आणि मातृदेश हीं पर-स्पराश्रयी आहेत; व एकाच्या संघटनेवर आणि उन्नतीवर दुसऱ्याची संघटना आणि उन्नति अवलंबून असते. या दृष्टीनें पाहिलें असतां, आपण आपल्या विधायक कार्यक्रमांत केवळ मातृभाषेच्या सेवेवरच भर देऊन न थांबतां, भाषा-वार प्रांतरचनेच्या कार्याचाहि समावेश त्यांत करावयाला पाहिजे, असें मला वाटतें.

असो. आपल्या हातीं राष्ट्रसभेचीं सूत्रें आल्यापासून अनेक प्रांतांना स्वतंत्र घटना मिळाली आहे; व त्यांपैकीं सीमाप्रांत, ओरिसा आणि सिंध या प्रांतांना तर ब्रिटिश सरकारनेंहि स्वतंत्र घटना दिली. त्या प्रांतांना ज्याप्रमाणें आपला सक्रिय पुरस्कार लाभला, त्याप्रमाणें तो महाराष्ट्रालाहि लाभो, अशी प्रार्थना करून हें पत्र संपवितों.

आपला नम्र

**ग. त्र्यं. माडखोलकर**

( ३ )

वर दिलेल्या पत्राला अनुलक्षून ता. १९ एप्रिल १९४२ च्या 'हरिजन' च्या अंकांत पृष्ठ ६३ वर म. गांधी यांचा पुढील लेख प्रसिद्ध झाला होता:—

## भाषावार प्रांत—

आंध्र प्रांताविषयीं विजयानगरमच्या महाराजकुमारांना मीं दिलेल्या उत्तरामुळें माझ्याकडे हिंदी व मराठीभाषी प्रांतांबद्दल लांबलचक पत्रें आलीं आहेत. त्यांतील मुद्दा असा आहे कीं, सर्व हिंदीभाषी प्रदेश हा एक प्रांत मानला जावा आणि त्याचप्रमाणें सगळे मराठीभाषी प्रदेश मिळूनहि एकच प्रांत मानला जावा. माझ्यापुरतें बोलायचें तर या सूचनेबद्दल मला पूर्ण सहानुभूति आहे. प्रांताच्या सीमा ठरविण्यास भाषेचें तत्त्व योग्य आहे, असा माझा विश्वास आहे. दोन प्रांत जर सलग नसले, तर त्यांची एकच भाषा असूनहि प्रांत निराळे राहण्यास माझी हरकत नाहीं. केरळ व काश्मीरची भाषा एकच असती, तरी मीं त्यांना दोन स्वतंत्र प्रांत म्हणूनच मानिलें असतें.

पण, लेखकांची अशी सूचना आहे कीं, मी प्रांतांच्या पुनर्विभागणीकरितां, किंवा प्रस्तुत प्रकरणीं, मराठी व हिंदी विभागांच्या एकीकरणाकरितां, स्वतः चळवळ सुरू करावी. ही सूचना अव्यवहार्य आहे. एकीकरणाची मागणी त्या त्या विभागांतील काँग्रेसवाल्यांकडून व्हावयास पाहिजे. ती मागणी जर एकमतानें करण्यांत आली, तर काँग्रेसला ती अमान्य करतां येणार नाहीं. ही गोष्ट अगदीं त्या त्या विभागांतील काँग्रेसवाल्यांच्या हातची आहे.

प्रस्तुत पत्रलेखकांनीं व इतरांनीं आपल्या सूचनेची आंध्र चळवळीशीं गल्लत करूं नये. काँग्रेसच्य घटनेप्रमाणें आंध्र हा आधीच स्वतंत्र प्रांत आहे. पण काँग्रेस मंत्रिमंडळाच्या कारकीर्दींतच आंध्र लोकानीं आपल्या प्रांताला कायद्याची मान्यता मिळवून घेण्याची चळवळ सुरू केली. प्रस्तुत पत्रलेखक आपल्या सूचनांकरिता काँग्रेसच्या मान्यतेची मागणी करीत आहेत.

निव्वळ योग्यायोग्यतेच्या दृष्टीनें मी या सूचनेचें समर्थन करीत असलों, तरी आज देशाच्या समोर जो मुख्य प्रश्न आहे म्हणजे अगदीं डोईवर येऊन—टेकलेल्या जपानच्या स्वारीच्या वेळीं प्रत्येक हिंदी माणसाच्या कर्तव्याचा प्रश्न त्या प्रश्नावरून दुसरीकडे लक्ष जाईल, अशा कोणत्याहि चळवळीचा पुरस्कर्ता मात्र मी मुळींच करणार नाहीं. प्रांताचें पुनर्विभाजन वगैरे प्रश्न आपापल्यापरी महत्त्वाचे असले तरी इतर सर्व प्रश्न या महान् प्रश्नासमोर फिके पडतात व अगदीं क्षुल्लक ठरतात. या गोष्टी लढाईचा शेवट होईपर्यंत सहज थांबू

शंकतात. प्रस्तुत संकटाचा अंत झाल्यावर आम्हांला एक नवीन दृष्य व नवीन व्यवस्था दिसेल, अशी आम्ही आशा करतों.

सेवाग्राम, १२–४–४२ (इंग्रजीवरून) मो. क. गांधी

( ४ )

## श्री. माडखोलकर यांचें उत्तर

शांतानिवास शुक्रवार तलावासमोर,
नागपूर शहर, ता. २४–४–४२

महात्मा गांधीजी यांचे सेवेसी,

कृ. सा. न. वि. वि. ता. १९ एप्रिलच्या 'हरिजन' च्या अंकांत माझ्या ता. ७ च्या पत्राला आपण जाहीर रीतीनें थोडक्यांत उत्तर देण्याची जी कृपा केली आहे, तिच्याबद्दल मी आपले मनःपूर्वक आभार मानतों. विशेषतः ( १ ) सगळे मराठीभाषी प्रदेश मिळून एक प्रांत व्हावा आणि ( २ ) एकीकरणाची मागणी त्या त्या प्रांतांतिल कॉंग्रेसवाल्यांकडून झाली पाहिजे, असा जो स्पष्ट अभिप्राय आपण त्या छोट्या लेखांत व्यक्त केला आहे, त्यामुळें महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या कार्याला बरीच मदत होईल, असें वाटतें. तथापि आपल्या लेखांतील कांहीं विधानें मला विवाद्य आणि कांहीं असमाधानकारक वाटलीं. म्हणून मी पुन्हां आज आपल्याला हें पत्र लिहून आणखी थोडा खुलासा करण्याची विनंति करीत आहें.

आपल्या लेखाच्या शेवटल्या परिच्छेदांत आपण जपानच्या स्वारीचा उल्लेख करून सद्यःस्थितींत दुसऱ्या कोणत्याहि चळवळीचा पुरस्कार मी मुळींच करणार नाहीं, असें म्हटलें आहे. ही घोषणा करण्याची काय आवश्यकता होती, हें मला समजत नाहीं. कारण, आपल्या स्वतःच्या आवडत्या रचनात्मक कार्यक्रमांतील खादीप्रचार, राष्ट्रभाषाप्रचार वगैरे नित्याच्या चळवळींत आपण नेहमीं इतक्याच उत्साहानें मन घालीत असल्याचें दिसतें. त्याचप्रमाणें गोसेवा-संघाच्या कार्यालाहि आपलें मार्गदर्शित्व लाभलें आहे. अशा स्थितींत, भाषावार

प्रांतरचनेच्या प्रश्नाकडे मात्र मी मुळींच लक्ष देणार नाहीं अशी जी घोषणा आपण केली आहे, ती मला सुसंगत वाटत नाहीं. शेवटच्या परिच्छेदांतील आपल्या या घोषणेमुळें आपण प्रारंभीं या प्रश्नाविषयीं दर्शविलेल्या महानुभूतींवर विरजण पडलें आहे, असें मीं म्हटल्यास तें अयोग्य होणार नाहीं.

मीं माझ्या पत्रांत आपल्याला फक्त एवढीच विनंति केली होती कीं, आपण महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या प्रश्नाकडे आस्थेनें लक्ष देऊन महाराष्ट्राच्या चारी भागांतील कॉंग्रेस कार्यकर्त्यांना त्या बाबतींत स्पष्ट मार्गदर्शन करावें. ही विनंति मीं कां केली याचा थोडा खुलासा आतां निरुपायानें करीत आहें. मराठी प्रदेशाच्या एकीकरणाची मागणी करणारे लोक, मग ते कॉंग्रेसवाले असोत वा कॉंग्रेसेतर असोत, प्रांतीयतेचे पुरस्कर्ते आणि राष्ट्रभाषेचे प्रतिस्पर्धी समजले जातात; व कॉंग्रेसला तत्त्वतः मान्य असलेल्या या चळवळीचा पुरस्कार करणाऱ्या महाराष्ट्रीयांवर प्रांतीयतेचा आणि जातीयतेचा आरोप केला जातो. याचें एक अगदीं ताजें प्रत्यंतर मी आपल्या निदर्शनाला आणून देतों. आपले या प्रांतांतील एक अग्रगण्य शिष्य खांडव्याचे पं. माखनलालजी चतुर्वेदी यांनीं ता. १८ एप्रिलच्या आपल्या 'कर्मवीर' पत्राच्या अंकांत महाविदर्भाच्या प्रश्नावर 'स्वतंत्रता का कब्रिस्तान' या मथळ्याखालीं जी टीका केली आहे, तिचा मी सोबत पाठवीत असलेला उतारा आपण पहावा. म्हणजे मराठी प्रदेशाच्या एकीकरणाच्या प्रश्नाकडे प्रमुख कॉंग्रेस कार्यकर्ते किती विकृत दृष्टीनें पहात आहेत, याची कल्पना आपल्याला येईल. या प्रश्नाविषयीं कॉंग्रेस कार्यकर्त्यांची अनुत्सुकता, साशंकता आणि त्यापैकी कांहींचा उघड विरोध लक्षांत घेऊनच या बाबतींत आपण कॉंग्रेस कार्यकर्त्यांना स्पष्ट मार्गदर्शन करावें अशी विनंति मीं आपल्याला केली होती आणि पुन्हां करीत आहें. आपण या चळवळीचा स्वतः पुढाकार घ्यावा, असें माझें मुळींच म्हणणें नाहीं.

आपल्या लेखाच्या तिसऱ्या परिच्छेदांत आपण असें म्हटलें आहे कीं, कॉंग्रेस मंत्रिमंडळाच्या कारकीर्दीतच आंध्र लोकांनीं आपल्या प्रांताला कायद्याची मान्यता मिळवून घेण्याची चळवळ सुरू केली. मध्यप्रांत-वऱ्हाडांतील सगळ्या सलग मराठीभाषी प्रदेशाचा विदर्भ किंवा महाविदर्भ या नांवानें स्वतंत्र प्रांत करण्यांत यावा, ही वऱ्हाड-मध्यप्रांतांतील मराठीभाषीयांची मागणी मध्यप्रांतीय असेंब्लींत ता. १ ऑक्टोबर १९३८ रोजीं ठरावरूपानें मांडण्यांत आली; व

काँग्रेस मंत्रिमंडळातर्फे त्या वेळचे मुख्य प्रधान पं. रविशंकर शुक्ल यांनी त्या ठरावाला मान्यता दर्शविल्यावर ती मागणी मध्यप्रांतीय असेंब्लीनें मंजूर केली. अशा रीतीनें वऱ्हाड-मध्यप्रांतांतील मराठी प्रदेशाच्या एकीकरणाला म्हणजेच महाविदर्भ प्रांताच्या निर्मितीला मध्यप्रांतीय असेंब्ली आणि काँग्रेस मंत्रिमंडळ या दोघांनींहि मान्यता दिलेली आहे, ही गोष्ट कदाचित् आपल्या स्मरणांत नसावी. महाविदर्भ प्रांताची निर्मिति हा महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीचाच एक भाग समजला जातो; व त्याला काँग्रेस मंत्रिमंडळाची कायदेशीर मान्यताहि लाभलेली आहे, हें या पत्रासोबत मी पाठवीत असलेल्या प्रांतिक असेंब्लीच्या ठरावावरून आपल्या लक्षांत येईल. काँग्रेस मंत्रिमंडळानें हा ठराव वरिष्ठ सरकारकडे पाठविला किंवा दप्तरदाखल केला हें कळावयाला आतां मार्ग नाहीं. पण, महाविदर्भाच्या स्वतंत्र प्रांतघटनेला काँग्रेसच्या कारकीर्दीत मिळालेली ही कायदेशीर मान्यता लक्षांत घेऊन, आपण नागपूर आणि वऱ्हाड प्रांतांतील काँग्रेस कमिट्यांना तो ठराव काँग्रेसच्या कारभारापुरता तरी अमलांत आणण्याचा आदेश द्यावा, अशी विनंति मी आपल्याला करतों.

आपल्या लेखाच्या शेवटीं आपण महायुद्धानंतरच्या नवीन दृश्याचा आणि व्यवस्थेचा उल्लेख केला आहे; व लढाई संपेपर्यंत या गोष्टी सहज थांबूं शकतील, असेंहि म्हटलें आहे. पण महायुद्ध संपल्यानंतर जी नवीन व्यवस्था व्हावयाची, त्या व्यवस्थेंतील आपलें स्थान आणि दर्जा निश्चित करून घेण्याची चळवळ जर महाराष्ट्रीयांनीं एव्हांपासूनच केली नाहीं, तर १९२०सालीं महाराष्ट्राचे जे चार तुकडे नव्या काँग्रेस घटनेनुसार पाडण्यांत आले, ते लढाई संपल्यावर होणाऱ्या नवीन व्यवस्थेंतहि कायम राहण्याची सकारण भीति वाटते. म्हणूनच मी आज आपल्याला या प्रश्नाकडे कळकळीनें लक्ष देण्याची विनंति करीत आहें. आंध्र जनता आणि तिचे डॉ. पट्टाभिसीतारामय्या यांच्यासारखे मूर्धाभिषिक्त काँग्रेस पुढारी हे या युद्धकाळाच्या विप्लवांतहि आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेसाठीं किती चिकाटीनें प्रयत्न करीत आहेत, हें आपल्याला माहीतच आहे.

असो. शेवटीं माझ्या पत्रांतील मुख्य मुद्दे पुढें देतों:—(१) भाषावार प्रांतरचनेचें तत्त्व काँग्रेसला मान्य असल्यामुळें महाराष्ट्राच्या एकीकरणाची महाराष्ट्रीयांची मागणी आणि चळवळ न्याय्य आणि निरपवाद आहे, असें आपण

काँग्रेसवाल्यांना अनुलक्षून जाहीर करावें. (२) पश्चिम महाराष्ट्र, मुंबई शहर वऱ्हाड आणि नागपूर या महाराष्ट्राच्या चार भागांतील प्रांतिक काँग्रेस कमिट्यांनीं महाराष्ट्राच्या एकीकरणासाठीं सनदशीर प्रयत्न करण्याची इष्टता आपण सूचित करावी. (३) महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीचा एक भाग म्हणून महाविदर्भाचा स्वतंत्र प्रांत करण्याची जी मागणी वऱ्हाड-मध्यप्रांतांतील असेंब्ली आणि काँग्रेस मंत्रिमंडळ यांनीं मंजूर केली आहे, तिला आंध्र प्रांताच्या कायदेशीर मागणीप्रमाणेंच आपण पाठिंबा द्यावा. (४) भाषावार प्रांतरचनेच्या प्रश्नाला आपण आपल्या रचनात्मक कार्यक्रमांत स्थान द्यावें. (५) महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीचें आपण प्रत्यक्ष नेतृत्व घ्यावें अशी मुळींच अपेक्षा नाहीं. फक्त त्या चळवळीला चुकीच्या कल्पनांनीं होणाऱ्या विरोधाचा परिहार करण्यासाठीं तिला पाठिंबा देऊन आपण मार्गदर्शन करावें, एवढाच आग्रह आहे.

या पांच मुद्यांसंबंधीं आपण जर जाहीर रीतीनें आपला स्पष्ट अभिप्राय प्रकट केला, तर काँग्रेस पक्षांत आज महाराष्ट्र आणि महाविदर्भ यांच्या एकीकरणाच्या आणि स्वतंत्र प्रांतघटनेच्या प्रश्नासंबंधीं जो विरोध दृष्टीस पडतो तो नाहींसा होईल; व आंध्र देशाच्या स्वतंत्र प्रांतघटनेच्या प्रश्नाप्रमाणेंच महाराष्ट्राच्या स्वतंत्र प्रांतघटनेचा प्रश्नहि, आपण आपल्या लेखात उल्लेखिलेली नवीन व्यवस्था अमलांत येण्याच्या सुमारास, व्यवहार्य राजकारणाच्या कक्षेंत येऊन बसेल. मला आशा आहे कीं, महाराष्ट्राच्या एकीकरणाच्या चळवळीला काँग्रेसवाल्यांकडून होत असलेला अन्याय्य विरोध दूर करण्याचें आणि आंध्र देशाप्रमाणें त्याला स्वायत्ततेच्या मार्गाला लावण्याचें श्रेय घेऊन आपण माझी प्रार्थना सफल कराल.

आपला नम्र

**ग. त्र्यं. माडखोलकर**

(५)

## इंग्रजी स्मरणपत्र

'Shanta Niwas'
Oppo. Shukrawar Talao
Nagpur City, 27th June 1942

Dear Mahatmaji,

I sent you a Marathi letter through my friend Acharya Dada Dharmadhikari on the 24th of April, 1942. It is my second Marathi letter addressed to you about the question of Maharashtra unification. You have kindly replied to my first letter in the 'Harijan' of the 19th April. Dada has assured me that you intend to give a reply to my second letter also as soon as you find time

I would not have troubled you so soon with this reminder, as I know you are at present engrossed in the deliberations of far greater problems But as the Mahavidarbha Conference is to be held under the presidency of the Rt Hon'ble Dr. M R. Jaykar sometime in the month of August, I want you to give your support and blessings to the Mahavidarbha Movement which we consider to be the first step of the unification of Maharashtra To us the unification of Maharashtra is a question of questions and the solution of that question depends entirely on the future of Berar. You have been living amongst us in the heart of Mahavidarbha for the last eight years and hence it will not be

too much on my part if I ask your blessings to the Mahavidarbha Movement.

I request you, therefore, to give a reply to my letter of the 24th April at your earliest convenience. Dear Dada has kindly agreed to explain my letter to you if necessary, on my behalf.

With my profound respects,

Yours sincerely
**G. T. Madkholkar**

(६)

## गांधीजींचें उत्तर

सेवाग्राम, वर्धा, सी. पी.
ता. २९-६-४२

भाई माडखोलकर,

आपका खत मेरे सामने पडा है. अब इंग्रेजी मिला. बात यह है कि मैं धर्मसंकट में हूं। महाराष्ट्र के सब विभाग एक प्रांत बनें उसमें मेरी पूर्ण संमति है. लेकिन इस समय इस आंदोलन उठानेमें मुझे शंका है. जब सब चीज खतरेमें हैं तब यह एक प्रश्नका अलग महत्त्व देने में कहांतक औचित्य है मैं नहीं जानता हूं. अगर अंतमें हिंदुस्थान आझाद बनेगा तो ऐसे सब प्रश्न अपने आप हल हो जायगे. ऐसी मेरी मानसिक स्थितीमें मैं कहांतक मदद दे सकता हूं ?

आपका
**मो. क. गांधी**

(७)

## श्री. माडखोलकर यांचे ठराव

श्री. माडखोलकर यांनीं महाराष्ट्र साहित्यसंमेलन आणि महाराष्ट्र साहित्य-परिषद यांच्या अधिवेशनासाठीं पुढील तीन ठराव ता २१ एप्रिल १९४६

रोजीं संमेलन आणि परिषद यांच्या कार्यवाहांकडे पाठविले आहेत :—

( १ ) हिंदुस्थानाचें स्वातंत्र्य आणि स्वतंत्र हिंदुस्थानाची राज्यघटना यासंबंधीं ज्या वाटाघाटी सध्यां ब्रिटिश सरकार आणि राष्ट्रसभा, हिंदु महासभा, मुस्लिम लीग, शेड्युल्ड कास्ट्स् फेडरेशन वगैरे पक्षांचे नेते व हिंदी संस्थानांचे अधिपति यांच्यामध्यें चालू आहेत, त्यांवरून असें स्पष्ट दिसतें कीं, हिंदुस्थानांत स्वतंत्र राष्ट्रीय सरकार स्थापन करण्याच्या वेळींच भाषा आणि संस्कृति यांच्या दृष्टीनें हिंदी प्रांतांची पुनर्घटना करण्यांत येईल. या पुनर्घटनेच्या वेळीं मुंबई आणि मध्यप्रांत-वऱ्हाड या दोन प्रातांतलि सर्व सलग मराठी प्रदेश, हैद्राबाद संस्थानांतील मराठवाडा, पोर्तुगीज सत्तेखालील गोमातक व महाराष्ट्राच्या चतुःसीमांतलि सर्व मराठी संस्थानें यांचा संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करण्यांत यावा. हा संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करतांना मुंबई, मध्यप्रांत-वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमांतक यांच्या सरहद्दींवरले जे मराठीभाषी भाग आज अन्यभाषी प्रांतात सामील केले गेलेले आहेत, ते भागहि संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट करण्यांत यावेत, अशी या सभेची मागणी आहे.

( २ ) संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करतांना त्याच्या सरहद्दीवरील मराठी भाषी प्रदेशासंबंधीं जर कांहीं वाद उत्पन्न झाला, तर त्या वादाचा निकाल लावण्यासाठीं सीमासमिति नेमण्यांत यावी; व त्या समितीनें प्रांताच्या सीमा निश्चित करतांना खेडें हें परिमाण ठरवून त्या खेड्यांतील बहुसंख्य जी भाषा बोलत असतील, ती भाषा बोलणाऱ्या प्रदेशांत त्या खेड्याचा समावेश करावा अशी या सभेची शिफारस आहे. कोणतें खेडें कोणत्या भाषेच्या प्रांतांत समाविष्ट करण्यांत यावें हें ठरवितांना या सीमासमितीनें त्या त्या खेड्यातील वयांत आलेल्या प्रत्येक व्यक्तीचें मत गुप्त मतदान पद्धतीनें नोंदवून घेऊन तदनुसार या प्रश्नाचा निर्णय लावावा अशी या सभेची सूचना आहे.

( ३ ) हैद्राबाद संस्थानांतलि ४५ लक्ष लोकसंख्येच्या मराठवाड्याला आज विचारस्वातंत्र्य, मुद्रणस्वातंत्र्य आणि सभास्वातंत्र्य नसल्यामुळें त्याच्या राष्ट्रीय जीवनाचा सर्वतोपरीं कोंडमारा होत असून, तेथील मराठी जनतेचें भाषिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक जीवन नष्ट होण्याच्या पंथाला लागलें आहे. दुय्यम शिक्षणसुद्धां जनतेच्या मातृभाषेतून न देतां उर्दूसारख्या उपऱ्या

भाषेंतून दिलें जात असल्यामुळें उमलत्या नवीन पिढीवर महाराष्ट्र साहित्य आणि संस्कृति यांना सर्वस्वीं पारखें होण्याचा प्रसंग आला आहे. हैद्राबाद संस्थानांतील मराठी जनतेची ही दुर्धर स्थिति लक्षांत घेऊन ही सभा असें जाहीर करते कीं, संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण होईपर्यंत मराठवाड्याची भाषिक, शैक्षणिक आणि सांस्कृतिक उन्नति होण्यासाठीं त्याला पूर्ण प्रादेशिक स्वायत्तता देण्यांत यावी.

(८)

## ने. ना. डॉ. जयकर यांची मान्यता

ने. ना. डॉ. बाबासाहेब जयकर यांच्याकडे श्री. माडखोलकर यांनीं वरील तीन ठराव पाठविले होते. त्यांनीं त्यासंबंधीं पुढील पत्र पाठविलें आहे:—

Winter Road, Malabar Hill,
Bombay 6,
April 27, 1946

Dear Mr. Madkholkar,

I have received your letter. I am in agreement with the draft resolutions to be moved before the Belgaum Literary Conference.

Yours sincerely,
**M. R. Jayakar**

पुणें येथें महाराष्ट्र
युवक साहित्यसंमेलनाचे
अध्यक्ष या नात्यानें
केलेलें भाषण.

पुणें, २८ सप्टेंबर १९४६

## एकात्मता निर्माण करणारी शक्ति—

पण, आपल्यापासून जी यौवनाची स्फूर्ति मला हवी आहे, ती ययातीप्रमाणें कोणत्याहि कामनिक, कोणत्याहि वैयक्तिक लाभासाठीं नव्हे; तर संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेचें जें जीवनस्वप्न मूर्तावस्थेला येण्याची शक्यता आज दिसत आहे, त्याच्या सिद्धतेच्या कार्यांत आपला सहयोग मिळावा, एवढीच फक्त माझी अपेक्षा आहे. मराठीच्या अभिमानानें एकत्र येणें हें आपल्या सभेचें नियत कार्य असून, समाजाच्या सर्वांगीण संघटनेसाठीं साहित्याच्या शक्तीचा उपयोग करणें, हें आपलें ध्येय आहे. आपल्या सभेपुढें असलेल्या या कार्याची म्हणा वा ध्येयाची म्हणा पूर्तता महाराष्ट्र एकीकरणाशिवाय अन्य कोणत्या साधनेनें होणार आहे ? भाषा ही लोकांना केवळ एकत्रच आणते असें नव्हे, तर त्यांच्यांत एकात्मताहि उत्पन्न करिते. अनादि कालापासून विकसित होत आलेल्या मानवी संस्कृतीच्या, गंगेप्रमाणें, युगायुगांवर पसरलेल्या विविध प्रवाहांचें भाषा हें पात्र आहे. आत्मा आणि शरीर हीं जशीं अभिन्न, तशींच संस्कृति आणि भाषा हीं अभिन्न आहेत. भाषा ही निव्वळ विचारांचें वाहन नाहीं किंवा जीवनाचें मंडनहि नाहीं. ती जीवनाची धारिणी आणि जननी आहे. एका जीवाची दुसऱ्या जीवाला ती हांक आहे, एका आत्म्याचें दुसऱ्या आत्म्याला तें आवाहन आहे. ती हांक महाराष्ट्राच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत दुमदुमत उठावी आणि आज विस्कळित, विघटित अवस्थेंत असलेल्या मराठी बहुसमाजाची अस्मिता जागृत करून एकसंध, एकात्म मराठी राष्ट्रक तिनें निर्माण करावें, यापरतें मराठी भाषेच्या उपासनेचें उज्ज्वल ध्येय दुसरें कोणतें असूं शकेल ?

## संघर्षांतून उत्पन्न झालेली भाषा—

किंबहुना, मराठी भाषेचें अनन्य वैशिष्ट्य जर कोणतें असेल, तर तें हें कीं, ती संघर्षांतून उत्पन्न झाली आणि तिनें संघर्ष उत्पन्न केला. ती बंडाची आणि बंडखोरांची भाषा आहे. धार्मिक, जातीय आणि राजकीय जुलमानें गांजल्या गेलेल्या बहुजनसमाजाच्या दडपलेल्या अस्मितेंतून ती उफाळून प्रकट झाली आणि त्या अस्मितेचा परिपोष तिनें मोठ्या ईर्ष्येनें केला. वारकरी पंथ

घ्या, महानुभाव पंथ घ्या किंवा रामदासी पंथ घ्या, हे सारे पंथ म्हणजे मराठी जनतेनें त्या त्या काळच्या धार्मिक किंवा राजकीय जुलमाविरुद्ध केलेलीं बंडें आहेत. एका बाजूला सनातनी, संस्कृताभिमानी कर्मठ उच्च वर्ण आणि दुसऱ्या बाजूला पवित्र देववाणींत असलेल्या ज्ञानभांडाराला दुरावलेला निरक्षर, धर्मभोळा बहुजनसमाज यांच्या लढ्यांतून मराठी भाषा निर्माण झाली; व तो लढा केवळ संस्कृतच्या वर्चस्वाच्या कालांतच नव्हे, तर आज इंग्रजीच्याहि अधिराज्याच्या कालांत तिनें हिरीरीनें चालविला आहे. तेराव्या शतकांतील महानुभाव ग्रंथकार केशवराजसूरि यांची अशी गोष्ट सांगतात कीं, त्यांनीं ज्या वेळीं आपला मराठींत लिहिलेला 'सिद्धांतसूत्रपाठ' हा ग्रंथ संस्कृतांत अनुवादित करण्याचें मनांत आणलें, तेव्हां त्यांचे गुरुबंधु नागदेवाचार्य त्यांना म्हणाले, "नको गा केशवदेया! येणें माझीये स्वामीचा सामान्य-परिवारु नागवैल की!" संस्कृत ही असामान्य पंडितांची, अभिजात उच्चवर्णीयांची देवभाषा होती, तर मराठी ही सामान्य परिवाराची, निरक्षर बहुजनसमाजाची लोकभाषा होती. संस्कृताच्या शिरजोरीमुळें मराठीची त्या त्या कालांत होणारी हेटाळणी पाहूनच श्रीएकनाथमहाराजांनीं त्वेषानें विचारलें:—

**संस्कृतवाणी देवें केली। तरी प्राकृत काय चोरापासून जाहली?**

या त्यांच्या प्रश्नांत महाराष्ट्रांतील पंडितवर्ग आणि जनसमाज यांच्यामध्यें यादवकालीन साम्राज्यापासून पुढें सतत चारशें वर्षें चाललेल्या महाराष्ट्रांतील सांस्कृतिक आणि वैचारिक लढ्याचें मर्म साठविलेलें आढळतें. तो लढा अजूनहि संपलेला नाहीं. महाराष्ट्रांतील पांढरपेशा, बुद्धिप्रधान, बुद्धिजीवी वर्ग हा जसा प्राचीन काळीं संस्कृताचा अभिमानी होता, तसा आज इंग्रजीचा आहे; व शिक्षण आणि राज्यकारभार यांचें माध्यम इंग्रजी भाषा हेंच राहिलें पाहिजे, असें त्याला मनापासून वाटतें. पांढरपेशा वर्गाचें हें बौद्धिक पारतंत्र्य नष्ट होऊन महाराष्ट्रांत मराठीचें, बहुजनसमाजाच्या मातृभाषेचें राज्य सुरू झाल्याशिवाय राज्यकारभारांत भाग घ्यावयाला सामान्य लोक कसे समर्थ होतील?

## महाराष्ट्र एकीकरण हें साधन आहे—

महाराष्ट्र एकीकरण हा या लढ्याचा केवळ एक भाग आहे; मराठी बहुजन समाजाच्या दास्यमोचनाच्या लढ्यांतील अनेक आघाड्यांपैकीं ही फक्त एक आघाडी आहे. अर्थात् महाराष्ट्र एकीकरण हें साध्य नव्हे; निव्वळ साधन आहे. निरनिराळ्या राज्यसत्तांखालीं विभागल्या गेलेल्या मराठी भूमीचें एकीकरण झाल्यानें फार तर प्रादेशिक आणि राजकीय एकता उत्पन्न होईल. पण केवळ प्रादेशिक किंवा राजकीय एकीकरणानें मराठी बहुजनसमाजाच्या उन्नतीचा प्रश्न थोडाच सुटणार आहे ? महाराष्ट्राच्या भूमीप्रमाणेंच महाराष्ट्राची जनताहि विभागलेली आहे; मराठी प्रदेशाप्रमाणेंच मराठी समाजाचेहि तुकडे पडलेले आहेत. धार्मिक, सांस्कृतिक, राजकीय आणि आर्थिक भेदांमुळें महाराष्ट्रांत ज्या अनेक जाती, पंथ आणि वर्ग उत्पन्न झाले आहेत, ते सर्व नष्ट होऊन सारा मराठी जनसमाज हा एकसंध आणि एकात्म होणें म्हणजेच खरें महाराष्ट्र एकीकरण होणें होय. या सर्वांगीण एकीकरणांतून ज्याला आपण 'संयुक्त महाराष्ट्र' म्हणतों, तें भारतीय संघराज्यांतील एकजातीय, एकजीव, एकात्म मराठी राष्ट्रक आविर्भूत होईल. म्हणून, महाराष्ट्र एकीकरणाच्या प्रश्नाकडे केवळ तात्कालिक राजकीय दृष्टीनें न पाहतां, आजच्या पांगलेल्या, परतंत्र आणि परप्रत्ययनेय मराठी लोकसमाजांतून स्वयंपूर्ण, सुसंस्कृत आणि सामर्थ्यशाली नवमहाराष्ट्र आपल्याला निर्माण करावयाचा आहे, या दूरगामी व्यापक दृष्टीनें आपण त्या प्रश्नाकडे पाहिलें पाहिजे. प्रांतांची भाषावार पुनर्घटना झाल्यामुळें त्या त्या प्रांताच्या लोकभाषेंतून सारे व्यवहार सुरू होतील, बहुजनसमाजाला राज्यकारभारांत भाग घेणें सुलभ होईल आणि अशा रीतीनें लोकशाहीच्या स्थापनेचा मार्ग सुकर होईल, हे भाषावार प्रांतरचनेचे फायदे उघड दिसणारे आहेत; व महाराष्ट्राच्या प्रादेशिक एकीकरणामुळें ते सर्व आपल्याला मिळतील, यांत शंकाच नाहीं. पण संयुक्त महाराष्ट्र या शब्दप्रयोगानें व्यक्त होणाऱ्या कल्पनेचा अर्थ यापेक्षां कितितरी अधिक मूलगामी, विशाल आणि भव्य आहे.

## मराठी बहुजनसमाजाची आजची स्थिति—

तो अर्थ कोणता ? महाराष्ट्र आणि मराठी भाषा यांच्या घटनेचें विवरण

करतांना इतिहासाचार्य राजवाडे यांनीं असें म्हटलें आहे कीं, दंडकारण्यांतून 'महाराष्ट्र' निर्माण करण्याचा जो प्रयत्न हजार वर्षांपूर्वी नागवंशी मराठा जातींनीं केला, त्याला प्रगल्भ शास्त्रीय स्वरूप प्राप्त न झाल्यामुळें महाराष्ट्र हें 'बालराष्ट्र'च राहिलें. इतिहासाचार्यांचीं या विवरणातील सर्वच विधानें आपल्याला मान्य होतील, असें नाहीं. पण, एका मागासलेल्या जंगली प्रदेशां-तून त्या भूमीचे पुत्र जेव्हां राष्ट्रनिर्माणाच्या विशाल कल्पनेनें प्रेरित होऊन त्या वेळच्या अवनत, विस्कळित परिस्थितींतून वर डोकें काढण्याचा प्रयत्न करतात, तेव्हां तो प्रयत्न कोणत्या कारणांमुळें फसला, हें जर त्या राष्ट्रनिर्मात्याच्या आधुनिक वंशजांनीं नीट तपासून पाहिलें नाहीं, तर आजच्या अगदीं बदललेल्या परिस्थितींत तरी त्यांचा अभ्युदय कसा होणार ? आठशें वर्षांपूर्वी यादवांचें साम्राज्य महाराष्ट्रांत चालू असतां, ज्या स्थितींत मराठी बहुजनसमाज होता, त्यापेक्षां जास्त चांगल्या स्थितींत तो आज आहे, असें मानण्याचें कारण नाहीं. त्यानंतर मुसलमान, मराठे आणि शेवटीं इंग्रज हे तीन राज्यकर्ते जरी येऊन गेले, तरी एकंदर समाजाच्या अंतरंगांत किंवा रचनेंत म्हणण्यासारखा कांहीं बदल, लक्षांत घेण्याजोगी कांहीं प्रगति झाली नाहीं. (१) ब्राह्मण, (२) ब्राह्मणेतर, (३) अस्पृश्य आणि (४) वन्य हे जे तत्कालीन मराठी जनतेचे चार प्रमुख घटक होते, ते आजहि बव्हंशां त्याच स्थितींत कायम आहेत. त्यांच्या भरीला पारशी, यहुदी, मुसलमान आणि ख्रिस्ती हे जरी आणखी चार नवीन समाज मागाहून आले असले, तरी ते इतके अल्पसंख्य आहेत कीं, त्यांच्या महाराष्ट्रांतील वास्तव्याचा मराठी बहुजनसमाजावर कांहीं विशेष परिणाम झाला आहे किंवा होण्याची शक्यता आहे, असें म्हणतां येणार नाहीं. हजार वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत ज्या जाती होत्या, त्याच आजहि आहेत. कदाचित् त्यांत थोडी वाढच झाली असेल; घट खास्तीनें नाहीं. पण इंग्रजी अमदानींत एक महत्त्वाची क्रांति झाली. ती अशी कीं, जुन्या धंदेवाईक जाती वंशनिष्ठते मुळें जरी अद्याप कायम राहिलेल्या असल्या, तरी त्यांचे धंदे मात्र बहुतेक ठार बुडाले असून, औद्योगिक परिवर्तनामुळें त्यांच्या जोडीला आणखी वर्ग पैदा झाले आहेत. यादवकालांत आणि नंतर मराठेशाहींत (१) शेतकरी, (२) शिलेदार (३) कारकून आणि (४) कारागीर असे बहुजनसमाजाचे जे चार मुख्य औद्योगिक घटक होते, ते लुप्त होऊन आतां फक्त [ १ ] भांडवलदार

आणि [ २ ] कामगार असे दोन वर्ग उत्पन्न होऊं घातले आहेत. सारांश, जुन्या कायम असलेल्या जन्मसिद्ध जातींच्या जोडीला नवे उद्योगसिद्ध वर्ग येऊन, महाराष्ट्रांतील बहुजनसमाज आज जास्त विघटित, जास्त विस्कळित झालेला दिसतो.

## जातिनिबद्ध आणि वर्गनिबद्ध समाज—

या निरनिराळ्या जातींतून आणि वर्गांतून जातिवर्गभेदरहित एकात्म समाज निर्माण करणें म्हणजेच संयुक्त महाराष्ट्र निर्माण करणें होय. प्रादेशिक एकीकरणानें हें क्रांतिकार्य सुकर होईल, यांत शंका नाहीं; व हिंदुस्थानांत जें मध्यवर्ती स्वतंत्र राष्ट्रीय सरकार स्थापन होण्याचा आतां दृढ संभव दिसत आहे, तें जर समाजसत्ताक लोकराज्याच्या ( Socialistic republic ) स्वरूपाचें राहिलें, तर मध्यवर्ती सत्तेंतील या क्रांतीचा सुपरिणाम महाराष्ट्राच्याहि समाजघटनेवर झाल्याविना राहणार नाहीं, हें खास. पण, प्रांत हीं स्वतंत्र, स्वयंभू घटक राज्यें ( State ) किंवा राष्ट्रकें ( Nationality ) राहिलीं पाहिजेत व त्यांच्या कारभारांत मध्यवर्ती सरकारनें हात घालतां कामा नये, हा जो दंडक भावी राज्यघटनेंत सुप्रतिष्ठित होण्याचीं स्पष्ट चिन्हें अनेक कारणांमुळें दिसत आहेत, त्याची अपरिहार्य प्रतिक्रिया लक्षांत घेतली असतां, भारतीय संघराज्यांतील प्रांतांना म्हणा किंवा राष्ट्रकांना म्हणा आपल्या भवितव्याचा विचार अंतर्गत बाबतींत तरी स्वतंत्र रीतीनें करावा लागेल, हें ओघानेंच येतें. हिंदुस्थानाच्या प्रत्येक प्रांतांतील प्रादेशिक आणि आर्थिक परिस्थिति भिन्न आहे; व त्यामुळें भारतीय संस्कृतीच्या आणि राष्ट्रीयतेच्या विशाल एकतेची जाणीव जनतेच्या मनांत सतत जागृत असूनहि प्रांतिक वैशिष्ट्याचा परिपोष होत गेल्याविना रहात नाहीं. भारतीय राजकारणाचें हें गुंतागुंतीचें स्वरूप लक्षांत घेऊनच महाराष्ट्राच्या भवितव्याचा विचार करणें भाग आहे. आज महाराष्ट्रांत संस्थानें, जमीनदाऱ्या, मालगुजारी, इजारे वगैरे सरंजामी समाजरचनेचे जुनाट अवशेष शिल्लक असून, शिवाय त्यांच्या भरीला भांडवलशाही झपाट्यानें पुढें येत आणि प्रबळ होत आहे. किंबहुना, महाराष्ट्राचें औद्योगीकरण म्हणजेच भांडवलशाहीचा उत्कर्ष असें समीकरण होऊन बसलें आहे, असें म्हटल्यास तें चूक होणार नाहीं. अशा स्थितींत जुनी धर्ममूल

जातिनिबद्ध समाजरचना आणि नवी अर्थमूल वर्गनिबद्ध समाजरचना यांचा समूळ उच्छेद केल्याशिवाय संयुक्त महाराष्ट्र कसा निर्माण होणार ?

**पहिलें कर्तव्य, पहिला कार्यक्रम—**

म्हणूनच महाराष्ट्राच्या प्रादेशिक एकीकरणाबरोबरच त्याच्या आर्थिक आणि सामाजिक संयोजनाचें कार्यहि निकडीनें हातीं घेणें अवश्य आहे. महाराष्ट्राच्या गेल्या हजार वर्षांच्या इतिहासांत असें एक चमत्कारिक दृश्य आढळून येतें कीं, त्याचें स्वातंत्र्य नष्ट होऊन ज्या ज्या वेळीं परकीय राज्यकर्ते या भूमींत सत्ताधारी झाले, त्या त्या वेळीं समाजांतील मुत्सद्दी, सरदारी आणि व्यापारी वर्गांनीं त्यांच्याशीं समरस होऊन आपल्या मायदेशांच्या पारतंत्र्याचें पाश दृढ करावयाला ईर्ष्येनें हातभार लावला आहे. महाराष्ट्रांतील मुस्लिम किंवा ब्रिटिश राजवटीचा इतिहास म्हणजे मराठी मुत्सद्दी, सेनानी किंवा कारभारी यांच्या परधार्जिण्या कर्तबगारीचा इतिहास होय. पढीक, प्रापंचिक, प्रवृत्तिमार्गी पांढरपेशांनीं परकी राज्यकर्त्यांशीं तादात्म्य पावून आपला उत्कर्ष साधून घ्यावा व निरक्षर, निर्धन, निवृत्तिमार्गी बहुजनसमाजानें आपल्या रक्ताळलेल्या मानेवर त्यांच्या जुलमी सत्तेचें जूं शतकानुशतकें मुकाट्यानें वहात रहावें, अशी गेल्या आठ शतकांची साक्ष आहे. पारतंत्र्याला, परकीय सत्तेच्या स्वागताला पोषक असलेली ही परिस्थिति कायमची नष्ट करावयाची, म्हणजे बहुजनसमाज स्वतंत्र, सुशिक्षित आणि संघटित झाला पाहिजे, त्याच्या ठिकाणीं आपण 'राष्ट्र' असल्याची जाणीव उत्पन्न होऊन तो राज्यसत्ता हातीं घ्यावयाला समर्थ झाला पाहिजे. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठीं ही बौद्धिक आणि सांस्कृतिक क्रांति प्रथम होणें अवश्य आहे. बहुजनसमाजाच्या ठिकाणीं आपण राष्ट्र असल्याची, देशांतील सर्व संपत्ति आणि उत्पादनाचीं साधनें यांच्यावर आपलें स्वामित्व असल्याची व त्या स्वामित्वाचा उपयोग आणि उपभोग समाजांतील प्रत्येक व्यक्तीला अनिर्बंध घेतां यावा म्हणून आजची विषम समाजरचना नष्ट करणें अवश्य असल्याची तीव्र जाणीव जोंपर्यंत उफाळून उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंत महाराष्ट्राचें प्रादेशिक आणि राजकीय एकीकरण होऊनहि मराठी बहुजनसमाज हा दैन्यावस्थेंतच राहील. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठीं ही क्रांति घडवून आणणें, हें आजच्या तरुण पिढीचें पहिलें कर्तव्य, पहिला कार्यक्रम असला पाहिजे.

## युवकांना मार्गदर्शन करा—

आणि खरोखरीच हा कार्यक्रम महाराष्ट्र युवकांनीं हातीं घ्यावा, अशी प्रार्थना या व्यासपीठावरून त्यांना करण्यासाठीच मीं हें अध्यक्षपद स्वीकारलें. बेळगांव-च्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें संयुक्त महाराष्ट्राची घोषणा करून ज्या उपेक्षित प्रश्नाला चालना दिली, त्याचें स्वरूप किती मूलगामी, व्यापक आणि उग्र आहे, याची थोडी तरी कल्पना आतां आपल्याला आली असेल. संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठीं जें क्रांतिकार्य आपल्याला करावें लागणार आहे, त्याचा महाराष्ट्र एकीकरण हा केवळ प्रारंभ आहे. महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हा सुशिक्षित आणि सुबुद्ध होऊन सर्व सत्ता, संपत्ति आणि उत्पादनाचीं साधनें यांचें स्वामित्व त्याला प्राप्त होणें, ही त्या कार्याची परिणति आहे. हें क्रांतिकार्य यशस्वी करावयाला साहित्याइतकें प्रभावी साधन दुसरें कोणतें सांपडेल ? निसर्गानें निर्मिलेल्या किंवा मनुष्यानें संशोधिलेल्या सर्व शक्तींपेक्षां शब्दशक्ति, साहित्याचें सामर्थ्य हें महनीय आहे. कारण मनुष्याच्या ठिकाणीं जी दिव्य चित्शक्ति आहे, तिचें मूर्त स्वरूप, तिचा दृष्य आविष्कार म्हणजेच साहित्य ! म्हणून, माझी आपल्याला अशी विनंति आहे कीं, या संक्रमणकालांत आपण आपल्या वाणीचा आणि लेखणीचा उपयोग संयुक्त महाराष्ट्राच्या स्थापनेसाठीं जी सामाजिक आणि आर्थिक क्रांति महाराष्ट्रांत होणें अवश्य आहे, ती घडवून आणण्यासाठीं करा. महाराष्ट्राच्या पूर्वेतिहासाविषयीं आपल्याला कितीहि अभिमान असला, तरी इतिहासाचार्योंनीं म्हटल्याप्रमाणें महाराष्ट्र हें खरोखरीच आज बालराष्ट्र आहे. तें न जागरूक, न ज्ञानी, न प्रगतिशील. पूर्वजांच्या कर्जबाजारी मुलूख-गिरीच्या पोवाड्यांवर आज आपण फोकारत आहोंत. तेव्हां, भारतीय संघराज्या-चा प्रमुख बलिष्ठ घटक म्हणून महाराष्ट्राला भावी राजकारणांत महत्त्वाचें स्थान मिळावें. अशी जर आपल्या मनाला तळमळ लागलेली असेल, तर त्याच्या एकीकरणाबरोबरच पुनर्घटनेचेंहि कार्य आपण हातीं घ्यावयाला पाहिजे. त्या दृष्टीनें हें संमेलन जर महाराष्ट्र युवकांना योग्य मार्गदर्शन करील, तर आपला हा अभिनव उपक्रम कारणीं लागला, असें मी म्हणेन.

---

५ ग्वाल्हेर येथें ग्वाल्हेर मराठी
साहित्यसंमेलनाचे अध्यक्ष
या नात्यानें केलेलें भाषण.

ग्वाल्हेर, ५ नोव्हेंबर १९४६

## मित्रहो,

मराठी साम्राज्याच्या उत्तर हिंदुस्थानांतील राजधानींत भरणाऱ्या या साहित्यसंमेलनाचें अध्यक्षपद मला दिल्याबद्दल मी प्रथम मुद्दाम आपले आभार मानतों. कारण, आपल्या अचाट कर्तबगारीनें एकोणिसाव्या शतकांतिल मराठशाहीच्या इतिहासाला विलक्षण उज्ज्वलता आणणाऱ्या महादजी शिंद्यांची ही राजधानी म्हणजे हिंदुस्थानांत आपली सार्वभौम सत्ता स्थापन करण्याच्या मराठ्यांच्या विफल आकांक्षांचें मूर्तिमंत स्मारकच होय. तेव्हां, अशा या वैभवशाली शहरांतील मराठी साहित्याच्या व्यासपीठावर उभें राहतांच मराठशाहीच्या विनाशाला कारण झालेल्या निरनिराळ्या घटनांचें स्मरण होऊन महाराष्ट्राच्या भवितव्याच्या दृष्टीनें त्यांची थोडी मीमांसा करण्याचा विचार मनांत येणें, हें स्वाभाविक नाहीं काय? किंबहुना, या संमेलनाचा अध्यक्ष म्हणून बोलण्याच्या निमित्तानें तशी संधि आपल्याला मिळत आहे, या जाणिवेनेंच खरोखरी मीं या बहुमानाचा स्वीकार केला. देवागीरीच्या यादवांचें साम्राज्य नष्ट झाल्यापासून गेल्या सातशें वर्षांत नर्मदेपासून तुंगभद्रेपर्यंत पसरलेला जो मराठीभाषी प्रदेश, मराठ्यांच्या मुलूखगिरीचा दरारा सर्व हिंदुस्थान गाजूनहि, मराठी राज्यसत्तेच्या छत्राखालीं कधीं येऊं शकला नाहीं, त्याच्या एकीकरणाचा प्रयत्न सध्यां चाललेला असून, संयुक्त महाराष्ट्राची स्थापना हा आज मराठी जनतेपुढील एकमेव व्यवहार्य राजकीय प्रश्न होऊन बसलेला आहे. अशा संक्रमणाच्या वेळीं मराठशाहीच्या अधःपाताची थोडी चर्चा जर आपण केली, तर मला वाटतें संयुक्त महाराष्ट्राच्या सिद्धतेला ती उपकारकच होईल.

## ' केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली '—

मराठशाहीच्या विनाशाची मीमांसा करतांना (१) राष्ट्रीय ध्येयाचा अभाव, (२) राष्ट्रीय एकतेच्या जाणिवेचा अभाव आणि (३) भौतिक शास्त्रांच्या प्रगतीचें अज्ञान हीं तीन कारणेंच मुख्यतः सांगितलीं जातात.किंबहुना, सर जॉन सीली किंवा सर व्हिन्सेंट स्मिथ यांच्यासारख्या परकीय इतिहासकारांचाच नव्हे, तर स्वामी विवेकानंद किंवा सर यदुनाथ सरकार यांच्यासारख्या स्वकीय विद्वानांचाहि मराठशाहीवर असा आक्षेप आहे कीं, उज्जयिनी किंवा विजयनगर येथील साम्राज्यांभोंवतीं जें सांस्कृतिक वैभवाचें तेजोवलय होतें, त्याचा यत्किंचितहि आढळ मराठ्यांच्या साम्राज्यांत कुठें होत नाहीं.

( Even a ray of reffection of that intellectual glory which surrounded the court of the Moghals much less the brillianoe of Malwa or Vijayanagar. )

मुलूखगिरी आणि लूट यांच्याशिवाय दुसरें ध्येय मराठ्यांपुढें नव्हतें, असें दूषण अनेक इतिहासकारांनीं त्यांना पुनःपुन्हां दिलेलें दृष्टीस पडतें; व या कोत्या, उथळ धोरणामुळेंच अंतर्गत प्रगति आणि पुनर्घटना या दोन्ही गोष्टींकडे त्यांचें दुर्लक्ष होऊन खर्ड्याच्या लढाईच्या वेळीं उत्कर्षाच्या शिखरावर असल्यासारखी दिसलेली मराठ्यांची सार्वभौम सत्ता अवघ्या पंचवीस वर्षांत धुळीला मिळाली, असा अभिप्राय तज्ज्ञानीं व्यक्त केला आहे. पण, मराठ्यांना कोणत्याहि प्रकारचें राष्ट्रीय ध्येय किंवा राष्ट्रीय एकतेची जाणीव नव्हती, हा आरोप कितपत खरा आहे ? मराठशाहीच्या इतिहासांत आणि मराठी मुत्सद्यांच्या आज्ञापत्रांत ' महाराष्ट्रधर्म ' हा जो शब्दप्रयोग वारंवार योजिलेला आपण पाहतों, तो काय केवळ निरर्थक आहे ? दक्षिण आणि उत्तर हिंदुस्थानांतील मुस्लिम पादशाह्यांशीं आमरण झुंज देऊन महाराष्ट्रांत धर्म-राज्याची स्थापना केल्याबद्दल रामचंद्रपंत अमात्यांनीं " केवळ नूतन सृष्टीच निर्माण केली " अशा अर्थपूर्ण शब्दांनीं श्रीशिवाजीमहाराजांचा जो गौरव केला आहे, तो काय केवळ औपचारिक समजावयाचा ? विजापूर दरबारच्या कैदेतून सुटल्यावर शहाजीराजांनीं श्रीशिवाजीमहाराजांना घातलेल्या पत्रांत, " विजापुरास

गुजरलेला निर्वाणीचा प्रसंग श्री तुमचा मनोरथ सिद्धीस नेणें व स्वधर्म राज्य-वृद्धि करणें म्हणोन पार पडला......आमचे मनोदय सेवटास नेणार तुम्ही सुपुत्र आहांत, " असे जे धन्योद्गार काढले आहेत, ते काय निव्वळ फोल मानून चालावयाचे ?

## राजसिंहासन, धर्मसिंहासन आणि लोकसिंहासन—

अर्थात् मराठयांच्या मुलूखगिरीच्या धोरणावर कोणी कितीहि आक्षेप घेतले, तरी त्यांच्या राज्यस्थापनेच्या प्रयत्नाच्या मुळाशीं निश्चित हेतु होता, विशिष्ट ध्येय होतें, हें उघड आहे. तो हेतु कोणता ? तो हेतु श्रीसमर्थांनीं श्रीशिवाजी-महाराजांच्या निधनानंतर श्रीसंभाजीमहाराजांना घातलेल्या पत्रांतील शब्दांचा उपयोग करून सांगावयाचें म्हणजे, " धर्मवृद्धीनें राज्यवृद्धि " हा होता. हाच हेतु ' महाराष्ट्रधर्म ' या अर्थगर्भ शब्दप्रयोगांत अधिक ठसठशीतपणानें, अधिक मार्मिकपणानें व्यक्त झालेला आहे. नाना आणि महादजी यांच्या त्या काळीं सर्व हिंदुस्थानांत गाजलेल्या शेवटच्या भेटीनंतर नाना फडणिसांनीं मराठयांचे निजामदरबारांतील वकील गोविंदराव काळे यांना घातलेल्या पत्रांत असे उद्गार काढलेले आढळतात कीं, " अटक नदीचे अलीकडे दक्षिण समुद्रापावेतों हिंदूंचें स्थान; मुसलमानांचा देश, तुर्कस्तान नव्हे. हें आपली हद्द पांडवांपासून विक्रमाजितपावेतों त्यांनीं राखून उपभोग केला. त्यामागें राज्यकर्ते नादान निघाले. यवनांचे प्राबल्य जालें. चकत्यांनीं हस्तनापूरचें पद घेतलें. शेवटीं आलमगिराचे कारकीर्दींत यज्ञोपवितास साडे तीन रुपये जेजया बसून ओलें अन्न विकावें सर्वांनीं घ्यावें हे नौबत गुंजरली. त्या दिवसांत कैलासवासी शिवाजीमहाराज हे शककर्ते व धर्मराखते निघाले......जाल्या गोष्टी यांत केवळ मुलूख, राज्यप्राप्ति इतकेंच नाहीं, तरी धर्मसंस्थापन, सार्वभौमत्व हातीं लागणें, कीर्ति, यश यांचे-नगारे वाजणें इतक्या गोष्टी आहेत. " नाना फडणिसांच्या या उद्गारावरून मराठशाहींतील मुत्सद्यांच्या डोळ्यांपुढें स्वराज्याचें म्हणा वा साम्राज्याचें म्हणा कोणतें ध्येय अखेरपर्यंत होतें, याची स्पष्ट कल्पना येत नाहीं काय ? महाराष्ट्राच्या छत्रपतीचें सिंहासन हें राजसिंहासन नव्हतें किंवा लोकसिंहासनहि नव्हतें तें धर्म-सिंहासन होतें; व म्हणूनच महाराष्ट्रराज्य हें धर्मराज्य आहे, अशी भावना

श्रीशिवाजीमहाराजांनीं रयतेला उद्देशून काढलेल्या अभयपत्रापासून तों नाना फडणिसांनीं जोधपूरच्या राजाला लिहिलेल्या स्नेहपत्रापर्यंत सर्व मराठी मुत्सद्यांच्या पत्रव्यवहारांतून पुनःपुन्हा प्रकट झालेली आढळते. महाराष्ट्रांतील संतमंडळानें जी वैचारिक क्रांति महाराष्ट्रांत घडवून आणली ती मूलतः धार्मिक होती; व त्यामुळेंच त्या क्रांतींतून उदित झालेलें महाराष्ट्राचें स्वराज्यहि धर्मराज्यच होतें.

## धर्मराज्य कां ?—

महाराष्ट्राचें स्वराज्य हें धर्मराज्य होतें, ही भाषा आजच्या काळांत मनाला रुचण्यासारखी नाहीं, हें मी जाणून आहें. किंबहुना, ब्रिटिश सम्राटाच्या बिरुदावळींतील ' धर्मरक्षक ' [ Defender of Faith ] ही पदवी जरी या विसाव्या शतकांतहि आपल्या कानांना खटकत नसली तरी छत्रपतींच्या बिरुदावळींतील ' गोब्राह्मणप्रतिपालक ' ही पदवी मात्र आपल्या मनाला अनेक कारणांमुळें आज बोंचते, हें कबूल केलें पाहिजे. पण मराठी मुत्सद्यांच्या पत्रव्यवहारांत वारंवार येणारे ' महाराष्ट्रधर्म ' आणि ' धर्मराज्य ' हे दोन शब्दप्रयोग महाराष्ट्रांतील संत, कवि, वीर आणि मुत्सद्दी यांच्या महाराष्ट्राकडे पहाण्याच्या विशिष्ट दृष्टिकोनाचे निदर्शक आहेत, ही गोष्ट जर आपण सारे पूर्वग्रह किंवा पश्चाद्ग्रह बाजूला सारून शुद्ध ऐतिहासिक दृष्टीनें लक्षांत घेतली, तर शिवकालीन क्रांतीचें आणि तिच्या विफलतेचेंहि मर्म आपल्याला कळून येईल. मराठी संतांच्या वाङ्मयांत काय किंवा मराठी मुत्सद्यांच्या कागदपत्रांत काय, " महाराष्ट्र ही धर्मभूमि आहे ", ही एकच एक भावना, ही एकच एक दृष्टि प्रभावी झालेली दिसते. " महाराष्ट्र हें सर्व राष्ट्रांसि राजे " असें जेव्हां मुक्तेश्वर उद्गारतात, तेव्हां तो त्यांचा उद्गार साम्राज्याकांक्षेच्या दर्पानें स्फुरलेला आहे, असें मानणें चुकीचें होईल. किंवा " येथुनी वांचती सर्वै । ते ते सर्वत्र देखती। सामर्थ्य काय बोलावें । आनंदवनभूवनीं ॥ " असा महाराष्ट्राचा महिमा जेव्हां समर्थ गातात, तेव्हां तें त्यांचें उद्गायन आपस्तुतीच्या ग्राम्य विकारांतून उफाळलेलें आहे, असें समजणें अन्यायाचें होईल. " महाराष्ट्र ही धर्मभूमि आहे आणि ती धर्मभूमि सर्व भरतखंडाचा उद्धार करील ", ही श्रद्धाच खरोखरी या उद्गारांत प्रतिध्वनित झालेली आहे. किंबहुना, "महाराष्ट्रीं असावें"

या श्रीचक्रधरांच्या सूत्राचें स्पष्टीकरण करतांना महानुभाव भाष्यकारानें असें स्पष्टच म्हटलें आहे कीं, " महाराष्ट्र म्हणजे महंतराष्ट्र । महंत म्हणजे थोर । जेतुला अर्थी आपुली थोरी असे । तेतुलाही अर्थी आगिकासी थोरी करी ।" ज्या भूमींतील संत, वीर, कवि आणि मुत्सद्दी यांची आपल्या मायदेशाकडे पाहण्याची अशा प्रकारची धार्मिक दृष्टि होती, त्या भूमींतील स्वराज्य हें धर्मराज्य आहे, अशी भाषा सर्वांच्याच तोंडीं खेळत असल्याचें दृष्टीस पडावें, यांत नवल काय ?

## 'इंग्रजांस ताण बसवितां'—

नवल वाटतें तें या गोष्टीचें कीं, इतकें उच्च ध्येय सतत दृष्टीपुढें असतां मराठशाहीचा नाश कसा झाला ? किंबहुना, मनाला पुन:पुन्हा साश्चर्य विषाद जर कोणत्या एका गोष्टीबद्दल वाटत असेल तर तो या कीं, दिल्लीची मोगल बादशाही आपल्या ताब्यात घेऊन अठराव्या शतकाच्या उत्तरार्धांत मराठ्यांनीं आपला शह सर्व हिंदुस्थानभर बसविला असतां, विजिगीषु ब्रिटिश सत्तेनें त्यांचा हां हां म्हणतां पाडाव करून हिंदुस्थानांत आपलें अधिराज्य स्थापन कसें केलें ? नाना आणि महादजी या अठराव्या शतकांतील दोघांहि मुत्सद्यांना इंग्रज शेफारत चालला असल्याची आणि आपला शेवटचा सामना त्याच्याशींच होणार असल्याची पूर्ण जाणीव होती; व त्या जाणिवेमुळेंच खरोखरी मुसलमानांशीं असलेलें आपलें पिढीजात पुराणें वैर बाजूला ठेवून त्यांनीं निजाम, टिपू, नजफखान प्रभृति मुस्लिम राजपुरुषांच्या सहकारितेनें इंग्रजांचें हिंदुस्थानांतून समूळ उच्चाटन करण्याचा प्रयत्न अखेरपर्यंत केला. मराठ्यांच्या स्वराज्यस्थापनेला प्रारंभ जरी हिंदुस्थानचे तत्कालीन जेते या नात्यानें मुसलमानांविरुद्ध धर्मयुद्ध पुकारून झाला असला, तरी एकदां मुस्लिम सलतनत खिळखिळी झालेली दिसतांच मुसलमान हे यापुढें आपल्याप्रमाणेंच या देशांत नांदावयाचे आहेत या भावनेनें मराठ्यांनीं त्यांना आपल्या स्नेहसूत्रांत गोवण्याची दूरदेशी दाखविली; व हिंदु आणि मुसलमान या दोघांवरहि मात करून जी तिसरी ब्रिटिश सत्ता त्या वेळीं झपाट्यानें डोकें वर काढीत होती, तिला ठेंचण्यासाठीं नाना आणि महादजी या दोघांनींहि आपआपल्या परीनें शर्तीचें राजकारण

केलें. महादजी शिंद्यांनीं ता. २७ जुलै १७८० रोजीं नाना फडणिसांना पाठविलेल्या पत्रांत इंग्रजांचा उच्छेद करण्यासाठीं सामुदायिक उठावणी करण्याची अशी योजना सुचविलेली होती कीं, " आपण व नबाब, भोसले मिळोन सुरत व मुंबईकडील तोंड राखावें. एक वर्ष इंग्रजांस आपण ठासून राखल्यास आम्हीं पादशहा व नजफखान वगैरे यांचीं राजकारणें आलीं आहेत त्यांस सामील करून घेऊन, हिंदुस्थानांतून इंग्रज इकडे येणार त्यांचें पारिपत्य करून, पुढें अंतरवेदींत जाऊन, इंग्रजांचा नीर काढीत काशीपर्यंत जाऊन, इंग्रजांस ताण बसवितों." ता. १३ ऑगस्ट १७८० रोजीं नाना फडणिसांना पाठविलेल्या दुसऱ्या पत्रांत महादजींनीं आपल्या या योजनेचा हेतु अगदीं स्पष्ट शब्दांनीं सांगितला आहे. या पत्रांत त्यांनीं नानांना असा इषारा दिलेला आढळतो कीं, " इंग्रज चहूंकडून वेष्टीत चालले. या समयीं चवघांनीं चहूंकडे मसलती आटोपल्यास बंदोबस्त होईल. नाहीं तरी कळतच आहे. " खरोखरी, महादजी शिंद्यांनीं रचनेला हा व्यूह जर तडीस गेला असता, तर सर यदुनाथ सरकार यांनीं म्हटल्याप्रमाणें, हिंदुस्थानच्या इतिहासाला अगदीं निराळीच कलाटणी मिळाली नसती काय ?

## मराठ्यांनीं गमावलेली संधि—

इंग्रजांस ताण बसविण्याचा महादजी शिंद्यांचा हा व्यूह जर यशस्वी झाला असता, तर हिंदुस्थानच्या राजकारणाला कोणती कलाटणी मिळाली असती, याची कल्पना करणें कठिण नाहीं. कारण, पानिपताच्या संग्रामानंतर जीं दोन महत्त्वाचीं परिवर्तनें हिंदी राजकारणांत घडून आलीं, त्यामुळें हिंदुस्थानाची नियति ठरून गेल्यासारखी झाली होती. पानिपताच्या युद्धांत जरी मराठ्यांचा पराभव झाला, तरी हिंदुस्थानाबाहेरून आलेल्या मुस्लिम विजेत्यांच्या साहाय्यानें आपल्या विच्छिन्न सार्वभौम सत्तेचें पुनरुज्जीवन करण्याचा प्रयत्न सिद्धीस जाण्याची शक्यता नाहीं, ही गोष्ट हिंदी मुसलमानांच्या पुरेपूर लक्षांत आली; व हिंदुस्थानांतील हिंदु राजेरजवाड्यांशीं मिळतें घेऊनच आपल्याला आता या देशांत नांदलें पाहिजे, हा विचार प्रथमच त्यांच्या मनांत उद्भवला. हें एक परिवर्तन झालें. दुसरें परिवर्तन असें कीं, हिंदुस्थानांतिल प्रमुख राजवंश हे

निःसत्त्व आणि निष्प्रभ होऊन त्यांचे अमात्य आणि सेनापति हे या वेळीं स्वतंत्र आणि सत्ताधारी होत चालले होते. दिल्लीचे बादशहा, सातारचे छत्रपति आणि पुण्याचे पेशवे हे तिघेहि अनुक्रमानें क्षीणबल होत होत, त्यांचे वजीर, निजाम, फडणीस आणि सरदार यांच्या हातांत सत्ता झपाट्यानें जात होती. मध्यवर्ती सत्तेचें हें विभाजन, जुने प्रबळ राजवंश कमजोर होऊन त्यांच्या सार्वभौम सत्तेचें होणारें हें विकेंद्रीकरण लोकशाहीच्या उदयाला अत्यंत अनुकूल होतें; व बादशहा, नबाब, वजीर, निजाम प्रभृतींच्या साहाय्यानें इंग्रजांस ताण बसविण्याचें महादजी शिंद्याचें अचाट राजकारण जर यशस्वी झालें असतें, तर मराठ्यांच्या नेतृत्वाखालीं हिंदुस्थानांत त्या काळीं असलेल्या अनेक राज्यांतून हळूहळू मध्यवर्ती हिंदी संघराज्याचा उदय होत गेला असता. मराठ्यांचें नेतृत्व हें अर्थातच येथें निमित्तमात्र समजावयाचें आहे. कारण खुद्द मराठशाही हीच मुळीं या वेळीं संघराज्य बनण्याच्या मार्गाला लागलेली होती. तेव्हां, महादजींची महत्त्वाकांक्षा सफल होऊन, जर इंग्रज नामोहरम झाले असते, तर मराठ्यांच्या बलिष्ठ संघराज्याचा आश्रय हिंदुस्थानांतील इतर राजेरजवाड्यांनीं घेतला असता आणि या सार्वभौम संघटनेची परिणति कालांतरानें हिंदी संघराज्यांत झाली असती, असें म्हटल्यास तें चूक होणार नाहीं. पण मराठ्यांच्या दुर्दैवानें हिंदी संघराज्य स्थापन करण्याची ही संधि त्यांनीं गमावली.

### राष्ट्रीय एकात्मतेचा अभाव—

मराठ्यांचें हें दुर्दैव म्हणजे त्यांच्या ठिकाणीं असलेल्या राष्ट्रीय दृष्टीचा अभाव हें होय. मराठ्यांच्या ठिकाणीं जर राष्ट्रीय एकात्मतेची जाणीव उत्कटतेनें असती, तर त्यांच्या धर्मराज्याचा विकास लोकराज्यांत झाला असता आणि तें मराठी लोकराज्य हिंदी संघराज्याच्या स्थापनेला कारण झालें असतें. पण मराठ्यांची कोती धार्मिक दृष्टि हीच खरोखरी त्यांच्या आणि पर्यायानें हिंदुस्थानाच्याहि नाशाला कारण झाली, हें कबूल करणें भाग आहे. मराठ्यांनीं आपलें स्वराज्य हें धर्मराज्य मानल्यामुळें वैदिक धर्माचीं जुनींपुराणीं अनुशासनें आणि जातिभेदाचीं जुलमी बंधनें हीं समाजाकडून दक्षतेनें पाळलीं जातात कीं नाहीं, हें पाहण्याची जबाबदारी छत्रपति आणि पेशवे यांच्यावर येऊन पडली; व ती त्यांनीं काटेकोरपणानें पाळल्यामुळें खालच्या जातींचा कोंडमारा होऊन

समाजांत भेदभाव कसे फोफावत गेले, याचें प्रतिबिंब छत्रपति आणि पेशवे यांच्या रोजनिशी, आज्ञापत्रें, निवाडे वगैरे ऐतिहासिक कागदपत्रांत पहावयाला मिळतें. वेदोक्ताचा अधिकार नसल्याचा निवाडा राज्यकर्त्यांनीं दिल्यामुळें महाराष्ट्रांतील कांहीं ब्राह्मणेतर जातींनीं मागल्या दारीं गुपचूप मुंजी करण्याचा जो प्रघात त्या काळीं सुरू केला, तो पेशवाई जाऊन आतां दीडशें वर्षें होत आलीं, तरी अद्याप चालूच आहे! 'महाराष्ट्रधर्म' म्हणजे "मराठ्यांचें महाराष्ट्राविषयींचें कर्तव्य" हा त्या शब्दप्रयोगाचा व्यापक विशिष्ट अर्थ जाऊन त्याच्याऐवजीं 'महाराष्ट्रधर्म' म्हणजे "श्रुतिस्मृतिपुराणोक्त धर्माचें परिपालन" असा सर्वसाधारण कर्मठ अर्थ त्याला आला. अर्थात् स्वराज्य म्हणजे देशांतील बहुजनसमाजाचें राज्य असें विशाल स्वरूप मराठ्यांच्या धर्मराज्याला प्राप्त न होतां तें केवळ उच्चवर्णीयांचें म्हणजे ब्राह्मण-क्षत्रियांचें राज्य होऊन बसलें. धर्मराज्याच्या या कल्पनेमुळें बहुजनसमाजाची कुचंबणा झाली; निवृत्तीचें नैराश्य त्याच्या ठिकाणीं उत्पन्न झालें; व राज्यकर्ते आणि प्रजाजन या दोघांनींहि जगांत चालू असलेल्या भौतिक शास्त्रांच्या प्रगतीची उपेक्षा केली. मराठ्यांच्या ठिकाणीं राष्ट्रीय दृष्टीचा किती विचित्र अभाव होता, याचें एक उद्बोधक प्रत्यंतर खुद्द महादजींच्याच ता. २७ जुलै १७८० च्या पत्रांत निदर्शनाला येतें. या पत्रांत इंग्रजास ताण बसविण्याची आपली योजना विशद करतांना "हिंदुस्थानांतील इंग्रज हांकीत बंगाल्याकडे चालविले म्हणजे त्यांचें घर संभाळणें कठीण पडेल!" असे उद्गार त्यांनीं काढले आहेत! आज हिंदुस्थानांत इंग्रज हा उपरा असल्याच्या तीव्र जाणिवेनें आपण 'चले जाव'ची घोषणा करितों. पण अठराव्या शतकांतील मराठ्यांना मुंबईकर इंग्रज, कलकत्तेकर इंग्रज आणि मद्रासकर इंग्रज हे कांहीं उपरे आणि परके वाटत होते, असें दिसत नाहीं!!

## ब्राह्मण, मराठा आणि महार—

अर्थात् मराठ्यांनीं आपलें स्वराज्य हें धर्मराज्य मानल्यामुळें त्यांच्या सामाजिक, भौतिक आणि राष्ट्रीय जीवनाचा कोंडमारा होऊन त्यांचा नाश झाला, हें उघड आहे. मराठ्यांचा स्वराज्यस्थापनेचा प्रयोग हा जर योग्य दिशेनें परिणत होत गेला असता, तर त्यांच्या धर्मराज्याचें रूपांतर लोकराज्यांत व्हावें, अशा प्रकारचीं विकासाचीं उन्नत बीजें त्यांत खचित होतीं. श्रीशिवाजी

महाराजांच्या राजनीतीचे अष्टप्रधानांची योजना, सरंजाम न देण्याचें धोरण, हिंदु-मुसलमानांत रणांगणाव्यतिरिक्त भेदभाव न करण्याची दूरदेशी इत्यादि कांही विशेष असे होते कीं, ज्यांचा परिपोष हा लोकराज्याच्या संस्थापनेला कारण झाला असता. पण त्यांच्या मृत्यूनंतर त्यांची राजनीति सुटली; व धर्मराज्याचें स्वरूपहि उत्तरोत्तर संकुचित होत गेलें. महाराष्ट्राचें बौद्धिक आणि राजकीय नेतृत्व जरी ब्राह्मण आणि मराठा क्षत्रिय या दोन जातींकडे गेलीं हजार वर्षें असलें, तरी या दोन जाति म्हणजे कांहीं सारा महाराष्ट्र, महाराष्ट्रांतील मराठी बहुजनसमाज नव्हे. महाराष्ट्रांतील बहुजनसमाज हा ब्राह्मण्य आणि क्षात्रत्व या दोन्ही उच्च संस्कारांपासून अलिप्त असलेल्या कुणबी, माळी, तेली, कोळी, कोष्टी, सुतार, लोहार, कलार, धनगर, न्हावी वगैरे अठरापगड धंदेवाईक स्पृश्य जाति आणि अस्पृश्य महार–चांभार, यांचा बनलेला आहे. या साऱ्या जातींना जरी महाराष्ट्राच्या गांवगाड्यांत म्हणजे ग्रामरचनेंत स्थान देण्यांत आलेलें असलें आणि त्यांपैकीं कांहीं जातींचा समावेश जरा मराठा–क्षत्रियांनीं अलिकडे आपल्या समाजांत करून घेतलेला असला, तरी राज्यकारभाराच्या वरच्या श्रेणींत मात्र ब्राह्मण, मराठे आणि प्रभु या तीन ब्रह्म-क्षत्र प्रमुख जातींचें वर्चस्व असल्याचेंच सदैव प्रत्ययाला येतें. महाराष्ट्राच्या गांवकींत स्थान मिळूनहि कुणबी हा अडाणी व अस्पृश्य हा समाजबाह्यच राहिला. याचा अर्थ असा कीं, धार्मिक भेदभावांमुळें महाराष्ट्रांतील स्पृश्य आणि अस्पृश्य बहुसंख्य जाति या अज्ञानी राहून महाराष्ट्राचें राष्ट्रीय जीवन खुरटून मरगळून गलें. ब्राह्मण, मराठा आणि महार हे महाराष्ट्राचे तीन राष्ट्रघटक आहेत. या तीन घटकांपैकीं कोणताहि एक घटक जोंपर्यंत दुर्बल आणि विकल राहील, तोंपर्यंत महाराष्ट्राचा अभ्युदय होणें कठीण आहे. या दृष्टीनें, शिवकालीन क्रांति जी अयशस्वी झाली, ती तिचा दृष्टिकोन आणि ध्येय धर्मप्रधान असल्यामुळें झाली, हें कबूल करणें भाग आहे.

## धर्मराज्य नको, लोकराज्य हवें—

मराठशाहीच्या विनाशाला जें हें तिचें धार्मिक वैशिष्ट्य कारण झालें तें लक्षांत घेऊन यापुढें शुद्ध लोकशाही समाजघटना आणि राज्यपद्धति महाराष्ट्रांत स्थापन होईल, अशी दक्षता आपण घेतली पाहिजे. ब्राह्मण, मराठा आणि महार या

महाराष्ट्रांतील तीन मुख्य जाति आहेत; महाराष्ट्राच्या राष्ट्रीय जीवनाचे हे तीन मेढे आहेत. या तीन जातींतहि मराठे हे त्यांच्या समावेशक धोरणामुळें अति-संख्य असून, शिवाय गेल्या हजार वर्षांची राज्यकर्तृत्वाची ऐतिहासिक उज्ज्वल परंपराहि त्यांच्या मागें आहे. ब्राह्मण हे जरी मराठयांइतके प्रबळ नसले तरी महाराष्ट्राच्या धार्मिक नेतृत्वाची मिरासदारी त्यांच्याकडे आजपर्यंत अविछिन्न राहिल्यामुळें, अल्पसंख्य असूनहि त्यांचें मराठी समाजांतील स्थान महनीय आहे. आजचा महाराष्ट्र आणि त्याची मराठी भाषा ही या तीन जातींचीच जोंपर्यंत एकात्मता उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंत एकसंध, संयुक्त महाराष्ट्र निर्माण होणें कठीण आहे. संयुक्त महाराष्ट्रांत उद्यां जें लोकराज्य स्थापन होऊं घातलें आहे, तें मराठा आणि महार या बहुसंख्य जातींचेंच होणार हें उघड आहे. पण जोंपर्यंत या स्पृश्य आणि अस्पृश्य जातींत सांस्कृतिक समानता आणि एकात्मता उत्पन्न होत नाहीं, तोंपर्यंत तें लोकराज्य यशस्वी आणि प्रभावी कसें होणार? व ब्राह्मणापासून महारापर्यंत सर्व जातींनीं आपल्या गुण-वैशिष्ट्यानें संपन्न केलेली नवमहाराष्ट्र संस्कृति तरी कशी निर्माण होणार? म्हणून, अशा प्रकारची सांस्कृतिक समानता आणि एकात्मता उत्पन्न करणें, हें महाराष्ट्रांतील लेखकांचें या संक्रमण कालांतील पहिलें कर्तव्य आहे. त्या कर्तव्याची जाणीव इंग्रजांस ताण बसविण्याच्या ईर्ष्येनें प्रेरित झालेल्या महादजी शिंद्यांच्या राजधानींतील साहित्याच्या या व्यासपीठानें मराठी लेखक वर्गांत उत्पन्न करावी, एवढीच माझी अपेक्षा आहे.

परिशिष्ट

# बेळगांवचा ठराव

बेळगांव येथें भरलेल्या महाराष्ट्र साहित्यसंमेलनाच्या तिसाव्या अधिवेशनांत ता. १४ मे १९४६ रोजीं श्री. माडखोलकर यांनीं मांडलेला पुढील ठराव मंजूर झाला :—

"(अ) हिंदुस्थानांत स्वतंत्र राष्ट्रीय सरकार लवकरच स्थापन होण्याचा संभव दिसत आहे. आणि तसें व्हावें अशी या सभेची तीव्र इच्छा आहे. सबब तसें होण्याच्या वेळीं हिंदी प्रांतांची भाषा आणि संस्कृति यांच्या दृष्टीनें पुनर्घटना करण्यांत आली पाहिजे. अशी पुनर्घटना करतांना मुंबई आणि मध्य-प्रांत–वऱ्हाड या दोन प्रांतांतील, तसेंच सध्यांच्या मुंबई आणि मध्यप्रांत–वऱ्हाड या दोनहि प्रांतांच्या स्थलसीमेंत मोडणाऱ्या देशी संस्थानांतील सर्व सलग मराठी प्रदेश, हैद्राबाद संस्थानांतील मराठवाडा आणि पोर्तुगीज सत्तेखालील गोमंतक यांचा संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करण्यांत यावा. हा संयुक्त महाराष्ट्र प्रांत निर्माण करतांना मुंबई, मध्यप्रांत–वऱ्हाड, मराठवाडा आणि गोमंतक यांच्या सरहद्दीवरले जे मराठीभाषी भाग आज अन्यभाषी प्रांतांत सामील केले गेलेले आहेत ते भागहि संयुक्त महाराष्ट्रांत समाविष्ट करण्यांत यावेत, असा या सभेचा आग्रह आहे.

(आ) वरील ठरावांत मान्य केल्याप्रमाणें 'संयुक्त महाराष्ट्र' प्रांत स्थापण्यांत यावा म्हणून आवश्यक ती खटपट करण्यासाठीं आणि सरकार व जनता यांच्यापुढें वेळोवेळीं निवेदनें तयार करून दाखल करण्यासाठीं व वरील 'संयुक्त महाराष्ट्र' विषयक ठराव आणि तसेंच आजवर म. सा. संमेलनांतून या विषयावर झालेले सर्व ठराव यांस अनुसरून काम करण्यासाठीं ही सभा 'संयुक्त महाराष्ट्र समिति' या नांवाची समिति स्थापन करीत आहे:—

(इ) या संयुक्त महाराष्ट्र समितींत पुढील सभासद असावे:—१ प्रा. द. वा. पोतदार (अध्यक्ष) २ श्री. शंकरराव देव, ३ श्री. केशवराव जेधे, ४ श्री. श्री. शं. नवरे आणि ५ श्री. ग. त्र्यं. माडखोलकर (निमंत्रक)

या समितीनें आवश्यकतेनुसार संयुक्त महाराष्ट्रामधील प्रमुख कार्यकर्त्यांचें साहाय्य घेऊन वा त्यांच्याशीं सहकार्य करून संयुक्त महाराष्ट्राची तपशीलवार कैफियत चार महिन्यांच्या आंत तयार करावी व ती म. सा. परिषदेला सादर करावी.

या समितीच्या खर्चासाठीं पांच हजार रुपयांचा प्राथमिक निधि या समितीनें जमवावा."

## मुंबईचा ठराव

ता. २८ जुलै १९४६ रोजीं मुंबई येथें संयुक्त महाराष्ट्र समितीतर्फे भरलेल्या महाराष्ट्र एकीकरण परिषदेंत पुढील ठराव मंजूर झाला: —

[ अ ] हिंदुस्थानांत लोकशाही राज्यघटना यशस्वी करण्यासाठीं प्रांतरचना भाषावार करणें हेंच इष्ट आणि आवश्यक आहे, असा या परिषदेचा विश्वास असल्यामुळें सर्व सलग मराठीभाषी प्रदेशाचा एक प्रांत शक्य तितक्या लवकर स्थापन करण्यांत यावा.

[ आ ] सध्यां या मराठी प्रदेशाचे पुढीलप्रमाणें तुटक विभाग पडलेले आहेत: —

( १ ) ब्रिटिश मुंबई प्रांतांतील मराठीभाषी भाग
( २ ) ब्रिटिश वऱ्हाड-मध्यप्रांतांतील मराठीभाषी भाग
( ३ ) या दोन्ही भागांना भिडलेला हैद्राबाद वगैरे देशी संस्थानांतील मराठीभाषी भाग आणि
( ४ ) पोर्तुगीज अंमलाखालील गोमंतक.

[ इ ] या तुटक विभागांपैकीं जेवढा विभाग आज साक्षात् ब्रिटिश सत्तेखालीं आहे, तेवढा तरी प्रथम अलग करून या सर्व विभागाचा एक मराठी प्रांत तावडतोब बनविण्यांत यावा आणि नंतर क्रमानें राहिलेले विभाग, साध्य होईल तसतसें, या मराठी प्रांतांत समाविष्ट करण्यांत यावेत.

[ ई ] स्वतंत्र हिंदुस्थानाची राज्यघटना तयार करण्यासाठीं भरणार असलेल्या घटनासमितींतील मुंबई आणि वऱ्हाड-मध्यप्रांत ह्या दोन प्रांतांतील मराठी प्रतिनिधींनीं भाषावार प्रांतरचनेचा प्रश्न उपस्थित करून या दोन प्रांतांतील मराठीभाषी प्रदेशांचा मराठी प्रांत बनविण्याचा प्रयत्न करावा.

ह्या ठरावावर डॉ. पंजाबराव देशमुख, सौ. प्रमिला ओक, श्री. दा. वि. गोखले, श्री. श्री. अ. डांगे, श्री. केशवराव जेधे, श्री. जैनुद्दिन हॅरिस, श्री. द. व्यं. पै, श्री. दिगंबरराव बिंदु, प्रो. वि. ह. कुळकर्णी, प्रो एझिकेल, प्रो. श्री. ना. बनहट्टी, श्री. रा. ब. सप्रे, श्री. बा. वि. शिखरे प्रभृति अखिल महाराष्ट्राच्या निरनिराळ्या भागांतील प्रतिनिधींचीं अनुमोदनपर भाषणें झाल्यावर तो मंजूर झाला.

हा ठराव सर्वानुमतें मंजूर झाल्यावर श्री. शंकरराव देव यांनीं पुढील दुसरा ठराव मांडला:—

( अ ) बेळगांव येथील महाराष्ट्र साहित्यसंमेलनानें संयुक्त महाराष्ट्र समिति नेमून जें कार्य केलें त्याबद्दल या परिषदेला संतोष वाटत आहे.

( आ ) पहिल्या ठरावांत निर्दिष्ट केल्याप्रमाणें मराठी प्रांत निर्माण करण्यासाठीं जरूर ती सर्व खटपट करण्याकरितां '**संयुक्त महाराष्ट्र परिषद**' ह्या नांवाची स्वतंत्र संस्था ही परिषद स्थापन करीत आहे.

( इ ) या सभेची घटना ठरविणें व त्याबरोबरच पुढील व्यवस्था होईपर्यंत वरील ठरावाची अंमलबजावणी करण्यासाठीं जरूर तीं सर्व कामें करणें यासाठीं ही सभा तात्पुरती समिति नियुक्त करीत असून तिला सर्व अधिकार देत आहे.

## अकोला येथें झालेला ठराव

अकोला येथें ता. ७ आणि ८ ऑगस्ट १९४७ रोजीं नागपूर, विदर्भ आणि महाराष्ट्र या संयुक्त महाराष्ट्राच्या तीन भागांतील प्रमुख कार्यकर्त्यांची अनौपचारिक सभा श्री. शंकरराव देव यांच्या अध्यक्षतेखालीं होऊन तींत संयुक्त महाराष्ट्राच्या घटनेसंबंधीं सर्वानुमतें जो ठराव मंजूर करण्यांत आला, तो त्यावरील संमतिदर्शक सह्यांसह पुढें दिला आहे:—

It is agreed that there shall be one province of United Maharashtra (Samyukta Maharastra) with sub-provinces for the Marathi-speaking areas of Central provinces and Berar, commonly styled Mahavidarbha, and West Maharastra with separate legislatures and

cabinets for the sub-provinces and with specified subjects under their jurisdiction. The province shall have the right to create other sub-provincial units whenever found necessary and feasible. There shall be one Governor and one Deputy Governor for the whole province elected by the whole province and a provincal cabinet and legislature dealing with the provincial subjects. The provincial legislature shall be composed of representatives of the people on the basis of population. The elections to the sub-provincial legislatures shall be held separately. Two High Courts shall function independently for the two sub provinces except for a common tribunal set up for specific jurisdiction. There shall be a common public services commission for the whole province.

| | |
|---|---|
| शंकरराव देव | शे. कृ. वानखेडे |
| मा. श्री. अणे | पंढरीनाथ पाटील |
| मा. सा. कन्नमवार | पू. राका |
| पं. शा. देशमुख | रामराव देशमुख |
| श्रीमन्नारायण अग्रवाल | ध. रा. गाडगीळ |
| दा. वि. गोखले | गोपाळराव खेडकर |
| ब्रिजलाल बियाणी | प्रमिला ओक |
| दत्तो वामन पोतदार | जी. आर. कुलकर्णी |

ग. त्र्यं. माडखोलकर

एकूण पृष्ठें १२८